# नवभारत

वर्ष ८ वें ]     एप्रिल १९५५     [ अंक ७ वा



वार्षिक वर्गणी ९ रु. ]     [ किरकोळ अंक १ रु.











अनुक्रमणिका



नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

## ‘ नवभारत ’ निधि

# विनंति

‘ नवभारत ’ मासिकाप्रीत्यर्थ येत्या डिसेंबर १९५५ अखेरपर्यंत किमान पन्नास हजार रुपयांचा निधि गोळा करण्याचा संकल्प व त्याकरितां एक विनंतिपत्रक ‘ नवभारता’च्या गेल्या जानेवारी व फेब्रुवारी १९५५ च्या अंकांतून प्रसिद्ध झालेंच आहे. त्या विनंतिपत्रकाखालीं सुमारें ७५ वर सह्या असून, सह्या करणारांमध्यें डॉ. धों. के. कर्वे, डॉ. मु. रा. जयकर, श्री. मा. श्री. अणे, श्री. बा. गं. खेर, श्री. ना. म. जोशी, श्री. स. का. पाटील, प्रा. ध. रा. गाडगीळ, श्री. केशवराव जेधे, श्री. भाऊसाहेब हिरे, न्या. मू. बा. रा. पुराणिक, श्री. दिगंबरराव बिन्दु, श्री. माधवराव बागल, श्री. दा. वि. गोखले, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, आचार्य प्र. के. अत्रे, प्रा. शं. वा. दांडेकर, श्री. वि. स. खांडेकर, संत तुकडोजीमहाराज, श्री. ना. ग. गोरे इत्यादि महाराष्ट्रांतील निरनिराळ्या भागांतील निरनिराळ्या क्षेत्रांत कार्य करणारे थोर लोक आहेत.

‘ नवभारत ’ निधीस सर्वांनीं आपल्या शक्यतनुरूप सढळपणें साहाय्य करावें, शक्य तों प्रत्येकीं निदान शंभर रुपये देऊन या निधीस साहाय्य द्यावें अशी विनंति वर उल्लेखिलेल्या विनंतिपत्रकांत केली आहे. १०० रु देणगी देणारास ‘ नवभारत ’ मासिक दहा वर्षें मिळत जाईल. त्या विनंतिपत्रकाला मान देऊन सर्वांनीं ‘ नवभारत ’ निधीस साहाय्य करावें अशी आमची सर्वांना प्रार्थना आहे.

‘ नवभारत ’ निधीला देणगी देणाऱ्यांचीं नांवें दर अंकांतून कृतज्ञतापूर्वक दिलीं जातील.

‘ नवभारता’च्या गेल्या म्हणजे मार्च १९५५ च्या अंकांत त्या वेळपर्यंत मिळालेल्या देणग्यांची पोहोंच व देणगीदारांचीं नांवें दिलींच आहेत त्यानंतर आतांपर्यंत ज्यांनीं देणग्या पाठविल्या त्यांचे आम्ही आभारी आहोंत. त्यांचीं नांवें व रकमा खालीं दिल्या आहेत :

| | रु. |
|---|---|
| श्री. म. रू. गांजवे एम्. एल्. ए., हैदराबाद | १०० |
| श्री. वा. रा. नातू, मुंबई | १०० |
| श्री. प्रभाकरपंत कोरगांवकर, कोल्हापूर | १०० |
| श्री. वा. गं. ठाकूर, वांद्रे, मुंबई | ३ |
| | ३०३ |
| मागील महिन्यांत जमा झालेली रक्कम | १५३९ |
| एकूण | १८४[illegible] |

गेल्या मार्चच्या अंकांत देणगीदारांच्या नांवांत श्री. रामचंद्र शंकरराव शेटे व श्री. आर्. एस्. भारतीय हीं नांवें दिलीं आहेत. त्यांच्यापुढें त्यांच्या गांवाचें नांव ‘ बीड ’ असें चूकून पडलें आहे. तेथें ‘ बीड ’ ऐवजीं ‘ धारूर ’ असें वाचावें.

‘ नवभारत ’ निधि जमविण्याकरितां पुढील समिति नेमली आहे : त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष), न्या. मू. भवानीशंकर नियोगी, श्री. देवकीनंदन नारायण, आचार्य स. ज. भागवत, श्री. बाबुराव जगताप, स्वामी रामानंदतीर्थ, प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. म. अ. चान्सरकर, श्री. वि. म. वेडेकर (खजिनदार), श्री. कृ. ना. फडके ( कार्यवाह ), श्री. मा. प. मंगुडकर ( कार्यवाह ).

‘ नवभारत ’ निधि-समितीचें कार्यालय c/o ‘ नवभारत ’ मासिक, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ येथें आहे. देणग्या “ खजिनदार, ‘ नवभारत ’ निधि-समिति, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ ” या पत्त्यावर पाठवाव्या अशी विनंति आहे.

लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष)

२५।३।१९५५ कृ. ना. फडके } कार्यवाह
पुणें ४ मा. प. मंगुडकर }










सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष आठवें | अंक सातवा

# नवभारत

एप्रिल १९५५

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख

प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



वार्षिक रु. ९ | सहामाही रु. ५ | अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, ‘नवभारत’ मासिक,
९०६ शिवाजी नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ‘ नवभारत ’ मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )

## 'नवभारत' मासिक, एप्रिल १९५५

### —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले त्या वेळीं दिला आहे– का. सं.]

**प्रा. ग. ना. जोशी** एम्. ए., पीएच्. डी. –नवसारी येथील गार्दा कॉलेजमध्यें तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक.

**डॉ. इरावती कर्वे**– पुणें येथील डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट ॲन्ड रिचर्स इन्स्टिट्यूटमध्यें 'समाजशास्त्रा'च्या प्राध्यापक. 'Anthropometric Measurements of the Marathas', 'Kinship Organization in India', 'मराठी लोकांची संस्कृति' इत्यादि पुस्तकांच्या लेखिका.

**श्री. प. प्रे. सुराणा** बी. ए. (ऑ.)– बिहारमधील गया जिल्ह्यांतील सोखोदेवरा येथील सर्वोदय आश्रमांतील एक भूदान-कार्यकर्ते.



अनुक्रमणिका








डॉ. ग. ना. जोशी

# व्यक्तिस्वातंत्र्य : एक यक्षप्रश्न !

सध्यां केवळ भारतच नव्हे तर जगांतील सर्वच राष्ट्रें एका महान् संक्रमणांतून जात आहेत. सर्वत्र नवें युग येऊं पाहात आहे. प्रत्येक व्यक्तीस आत्मविकासासाठीं भरपूर संधि मिळाली पाहिजे व समाजांत सर्वांचा समानपणें विकास होऊन सर्व समाज पूर्णतेस गेला पाहिजे असें सर्वांना वाटूं लागलें आहे. पूर्वीच्या समाजांतील उच्चनीचभाव, श्रेष्ठकनिष्ठपणा व वर्गविषमता नाहींशी करून समाजांतील खालच्या थराच्या लोकांचें वरच्या थराच्या लोकांकडून होणारें शोषण संपूर्णपणें नाहींसें करण्यासाठीं नव्या समाजरचना घडविल्या जात आहेत. हें उद्दिष्ट साध्य करण्याकरितां नव्या समाजरचनांच्या नव्या राजकीय प्रणाली उदयास येत आहेत. प्रचलित राजकीय प्रणालींत भांडवलशाही, साम्राज्यवाद, समाजवाद, साम्यवाद, फाशीवाद (फॅसिझम्), सर्वोदयवाद व अराज्यवाद या प्रमुख प्रणाली होत. प्रत्येक प्रणाली नवीन तऱ्हेनें समाजाची रचना करूं पाहात आहे. या प्रणालींचें तारूं व्यक्तिस्वातंत्र्याच्या प्रश्नावर आदळत आहे. नवसमाजरचनेंत व्यक्तिस्वातंत्र्य व व्यक्तींवर चालणारें शासनसंस्था व इतर सामाजिक संस्था यांचें नियंत्रण यांची सांगड कशी घालावयाची हा एक फारच मोठा प्रश्न सध्यां होऊन बसला आहे. थोडक्यांत ‘ व्यक्तिस्वातंत्र्य ’ हा आजचा ‘ यक्षप्रश्न ’ झाला आहे. भारतांतहि सध्यां कॉंग्रेस, प्रजासमाजवादी, साम्यवादी व जातीयवादी अशा राजकीय पक्षांत व्यक्तिस्वातंत्र्याच्या प्रश्नावर खूपच खल चालूं आहे. व्यक्तिस्वातंत्र्य हें एक थोर जीवनमूल्य समजण्यांत येऊन त्याच्या संरक्षणासाठीं म्हणजे शासनसंस्थेकडून व्यक्तिस्वातंत्र्यावर होणारें आक्रमण थांबविण्यासाठीं नवी राजकीय यंत्रणा घडविण्याचे प्रयत्न सुरू आहेत. म्हणून व्यक्तिस्वातंत्र्याचें स्वरूप, मर्यादा, आवश्यकता या सर्वांचा विचार होणें जरूर आहे.

## व्यक्ति व समाज परस्परावलंबी

प्रत्येक मानवी व्यक्ति मानवी समाजांत जन्माला येते, वाढते, जगते व लयाला जाते. व्यक्ति व समाज यांचा संबंध अविभाज्य आहे. व्यक्तींनीं समाज बनतो व समाजाशिवाय मानवी व्यक्तीस व्यक्तिमत्त्व – म्हणजे माणूसकी–म्हणजे मानवाची संस्कृति प्राप्त होऊं शकत नाहीं. व्यक्तींच्या केवळ एकत्र राहण्यानें समाज घडत नसतो; तर मानसिक दृष्ट्या व्यक्तींच्या परस्पराविषयींच्या आसक्तींतून समाजास ऐक्य व घनता प्राप्त होत असते. मानवी व्यक्ति बालकाच्या स्वरूपांत जन्माला येऊन तिची पूर्ण वाढ होऊन ती स्वावलंबी होईपर्यंत तिचें भरणपोषण, शिक्षण, शुश्रूषा हीं सर्व तिच्या कुटुंबांतील लोक म्हणजे समाज करीत असतो. कुटुंब किंवा समाज व्यक्तीची केवळ शारीरिकच वाढ करीत असतो असें नाहीं तर घरांतील वातावरणांतून व्यक्तीस बोलावयास शिकवून विविध प्रकारच्या कल्पना, विचार, श्रद्धा, परंपरा, रूढी, मानसिक आसक्ति, प्रेम, दया, सहानुभूति, प्रामाणिकता, सचोटी इत्यादि विविध गुण नकळतपणें व्यक्तींत संक्रमित करीत असतो. खरें पाहतां व्यक्ति सुरवातीचीं बरीचशीं वर्षें परावलंबी असते. तिचें पोषण, पालन, संवर्धन व घडण समाजच करीत असतो. समाजाकडून व्यक्तीच्या केवळ शारीरिक गरजाच पुरविल्या जात नाहींत, तर व्यक्तीची मानसिक व बौद्धिक घडणहि समाजच करीत असतो. समाज व्यक्तीला व्यक्तिमत्त्व प्राप्त करून देत असतो. हें जितकें खरें आहे तितकेंच समाजास विशिष्ट रंग, रूप, आकार व संघटित स्वरूप व्यक्तीच देत असतात. व्यक्ती स्वतंत्रपणें विचार करून आपल्या सामाजिक जीवनावरील प्रतिक्रिया व्यक्त करीत असतात. आपल्या संशोधक बुद्धीनें विचार करून व समाजाच्या जीवनास उपयुक्त असे अनेकविध शोध लावून व्यक्ती समाजजीवनास समृद्ध व आनंदी करण्याचा प्रयत्न करीत असतात. त्याचप्रमाणें व्यक्ती आपल्या अनेकविध विचारांची व भावनांची देणगी समाजास देऊन समाजास वैचारिक, भावनात्मक व नैतिक आकार देत असतात. व्यक्ति व समाज परस्परावलंबी असतात. व्यक्तीला समाज घडवीत असतो व समाजाला व्यक्ति घडवीत असते. एकाशिवाय दुसऱ्याचा विचार करतां येत नाहीं. तीं एकांत एक इतकीं मिसळून गेलीं आहेत कीं केवळ व्यक्तीचें कोणतें व केवळ समाजाचें कोणतें हें ओळखतां येत नाहीं. व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाचा नीट व संपूर्ण आविष्कार होण्यास सामाजिक परिस्थिति अनुकूल असावी लागते. अनुकूल परिस्थिति नसली तर व्यक्तीजवळ कितीहि जन्मजात सुप्तगुप्त विकसनशक्ती असल्या तरी त्या








साकार होऊं शकत नाहींत. कितीहि सुंदर व दमदार बीं असलें तरी तें योग्य व आवश्यक तें हवापाणी, खत व जमीन यांच्या अभावीं जसें मरून जातें तसेंच व्यक्तीचें पण घडतें. म्हणजे व्यक्तीच्या विकासास सामाजिक परिस्थितीच्या मर्यादा पडतात, व त्या व्यक्तीच्या विकासास नियामक ठरतात हें नाकारण्यांत अर्थ नाहीं. समाज व्यक्तीचें भरण, पोषण व शिक्षण करून व्यक्तीस आपलें स्वरूप व्यक्त करण्यास वाव देत असतो; व्यक्तीचें गुणग्रहण करून, प्रोत्साहन देऊन तिला तिचा अधिक विकास करण्यासाठीं आवश्यक तीं साधनें पुरवीत असतो. हें जितकें खरें आहे तितकेंच समाज कांहीं बाबतींत व्यक्तीवर नियंत्रण घालून तिच्या आचारविचारांचें नियंत्रणहि करीत असतो हेंहि तितकेंच खरें आहे. व्यक्ति सर्वच बाबतींत स्वयंपूर्ण होऊं शकत नाहीं. म्हणून व्यक्ति समाजावर अवलंबून असते. व्यक्तीचीं सुखें व दुःखें, आनंद व विषाद, समाधान व असमाधान, आशा व निराशा हीं जरी मानसिक असलीं तरी समाजावरच अवलंबून असतात. म्हणून व्यक्तीनें आपण स्वतंत्र राहूं असें कितीहि म्हटलें तरी वास्तविक परिस्थितीमुळें तिला खऱ्या अर्थानें स्वतंत्र राहतां येत नाहीं.

## शुद्ध बुद्धीची आवश्यकता

मग व्यक्तिस्वातंत्र्य म्हणजे समाजापासून अलग किंवा विभक्त होणें असें नसून व्यक्तीस स्वतःचें चांगलें व वाईट काय, योग्य व अयोग्य, इष्ट व अनिष्ट काय हें स्वतःचें ठरविण्याचें स्वातंत्र्य असणें व त्याप्रमाणें वागायला मोकळीक असणें यांत व्यक्तिस्वातंत्र्याचें खरें मर्म असतें. याहि दृष्टीनें विचार करतां बऱ्याचशा अडचणी उद्भवतात. व्यक्तिस्वातंत्र्याची कल्पना व्यक्तीच्या बुद्धिस्वातंत्र्यावर आधारलेली आहे. प्रत्येक व्यक्तीस बुद्धि असते, प्रत्येक व्यक्ति विवेकानें सत् व असत्, इष्ट व अनिष्ट जाणूं शकते व तसा फरक केल्यानंतर ती सत् किंवा इष्ट यांचा आचार करीत असते हें व्यक्तिस्वातंत्र्यामागील गृहीत तत्त्व आहे. व्यक्ति बुद्धिवादी ( Rational ) असते व ती आपली बुद्धि जें सदसत् किंवा इष्टानिष्ट ठरवील त्याप्रमाणें वागत असते हें गृहीत तत्त्व वादातीत नाहीं. मनुष्याची 'बुद्धिवादी प्राणी (rational animal)' अशी व्याख्या केलेली आहे. व्याख्येकरितां हें ठीक आहे. मनुष्यास बुद्धि असते व मनुष्येतर प्राण्यास ती नसते. म्हणून मनुष्यास इतर प्राण्यांपासून ओळखण्यासाठीं 'बुद्धिशीलता' हें मनुष्याचें व्यवच्छेदक लक्षण (differentia) मानणें अगदीं बरोबर आहे. परंतु वास्तविक अडचण आहे ती दुसरीच. मानवी व्यक्ति संपूर्णपणें बुद्धिनिष्ठ नसते. मनुष्याची प्रत्येक कृति त्याच्या केवळ बुद्धीनें ठरविली जात नाहीं. मनुष्यांत बुद्धीव्यतिरिक्त इतर भावना, कामवासना याहि कार्य करीत असतात. एवढेंच नव्हे तर त्याची बुद्धि शुद्धहि राहात नाहीं. तिच्यावर माणसाच्या भावना, इच्छा, पूर्वग्रह, दूषित मनोवृत्ति यांचाहि पुष्कळ वेळां खूप परिणाम होत असतो. म्हणून व्यक्तीनें स्वतःच्या विचारानें जरी एखादा निर्णय घेतला तरी तो त्याच्या शुद्ध बौद्धिक विचाराचा परिपाक आहे, असें नेहमीं मानतां येत नाहीं. त्याच्या गुप्तसुप्त इच्छा त्याच्या अन्तर्मना-(subconscious mind )मध्यें वास करीत असतात. त्याहि व्यक्तीच्या विचारावर तिला नकळतपणें आपला प्रभाव पाडून तिच्या विचारांवर व आचारांवर आपला रंग चढवीत असतात. म्हणून व्यक्तीनें स्वतःच्या वैयक्तिक भावना, विकार, मानसिक कल, पूर्वग्रह व इतर मानसिक दोष यांच्यापासून मुक्त झाल्याशिवाय तिला कोणत्याहि वस्तूचें वा घटनेचें तटस्थपणानें वस्तुनिष्ठ स्वरूप यथार्थपणें समजून घेतां येणार नाहीं. व तें समजल्याशिवाय तिला योग्य तो निर्णयहि घेतां येणार नाहीं जोंपर्यंत बुद्धि विकारांनीं झाकोळली जाऊं शकते तोंपर्यंत तिला सत् व असत् याचा निर्णय यथार्थपणें करतां येणार नाहीं. म्हणूनच भारतीय योगशास्त्रांत व गीतेंत साधकानें आपली बुद्धि निर्विकार व निष्काम केली पाहिजे असें आग्रहानें प्रतिपादिलें आहे. अशा प्रकारें आपल्या विकारवासना, इच्छा व पूर्वग्रह यांपासून मुक्त होऊन स्वतंत्रपणें विचार करूं शकणारा मनुष्य अत्यंत विरळा असतो. सर्वसामान्य मनुष्य आपल्या विकारांनीं प्रेरित झालेला असतो. तो विकारांच्या अधीन होत असतो व म्हणून त्याची बुद्धि खऱ्या अर्थानें स्वतंत्र नसते. तो विकार, इच्छा, भावना, पूर्वग्रह यांच्या अनुरोधानें विचार करीत असतो. म्हणून ' व्यक्तिस्वातंत्र्य ' खऱ्या अर्थानें टिकवायचें असेल तर माणसाची बुद्धि त्याच्या सर्व वैय-










क्तिक मानसिक दोषांपासून मुक्त व्हावयास हवी. आणि हें प्रत्यक्षांत क्वचितच सांपडतें.

## बुद्धिनिष्ठतेविरुद्ध कार्य करणाऱ्या शक्ती

दुसरें असें कीं व्यक्ति नेहमींच कोणत्याहि वस्तूचा, घटनेचा अथवा कृतीचा स्वतःच विचार करून मग इष्टानिष्ट ठरवीत असते असें म्हणतां येत नाहीं. सामाजिक पातळीवरून विचार करतां असें दिसून येतें कीं व्यक्तीस स्वतः सर्व गोष्टींचा गंभीरपणें विचार करणें आवडत नाहीं. तिला तें नकोसें होतें. स्वतः विचार करून योग्यायोग्य ठरविण्याचा त्रास घेण्याची मनुष्यास इच्छा नसते. मनुष्याला इतरांच्या तयार ( ready-made ) कल्पना, विचार, निर्णय उसने घेणें अधिक बरें वाटतें. म्हणून व्यक्तीस जरी स्वातंत्र्य दिलें तरी ती तें नेहमींच वापरते असें नाहीं. तिला तें नकोहि असतें. पुष्कळशा सामाजिक, राजकीय, धार्मिक, शैक्षणिक बाबतींत साधारणपणें अधिक शिकलेले लोक, ख्यातनाम, विचारवंत व लोकप्रिय नेते जे असतात त्यांचें म्हणणें खरें मानण्याची व त्यावर साक्षेपानें विचार न करतां तें स्वीकारण्याची मनोवृत्ति लोकांत दिसून येते. सामाजिक मानसशास्त्राच्या दृष्टीनेंहि विचार करतां असें दिसून येतें कीं व्यक्तीवर समाजाचे तीन प्रकारांनीं परिणाम होत असतात. या मुख्य तीन शक्ती म्हणजे सहानुभूति ( Sympathy ), अनुकरणशीलता ( Imitation) व सूचनक्षमता (Suggestibility) या होत. या तीनहि शक्ती समाजांतील व्यक्तींच्या मनावर फारच प्रभाव गाजवीत असतात. सहानुभूति, अनुकरणशीलता व सूचनक्षमता हीं माणसाला साक्षेपीपणें विचार न करूं देतां त्याचें मन वळवितात व बौद्धिक आधार नसतांनाहि इतर लोक जें सांगतील त्याच्यावर माणसाचा चटकन् विश्वास बसविण्याचें व त्याला तें स्वीकारायला लावण्याचें कार्य करीत असतात. सामाजिक, राजकीय, धार्मिक व शैक्षणिक क्षेत्रांतील प्रभावी नेते जें म्हणतील व ते जसें वागतील तें मानण्याची व तसें वागण्याची वृत्ति सर्वच लोकांत दिसून येते. या तीनहि शक्ती समाजांत ऐक्य व एकसारखेपणा निर्माण करण्यास जरी फार मोठी मदत करीत असल्या तरी त्या व्यक्तीच्या बुद्धिनिष्ठतेविरुद्ध कार्य करीत असतात. व्यक्तीस स्वतंत्रपणें कोणत्याहि प्रश्नाचा स्वतंत्रपणें विचार करण्यास या शक्ती प्रोत्साहन देत नाहींत. किंबहुना, त्या व्यक्तीस स्वतंत्रपणें विचार करूंहि देत नाहींत. म्हणून त्या व्यक्तिस्वातंत्र्यास बाधक ठरतात. राजकीय, सामाजिक व धार्मिक प्रचारक या तीनहि शक्तींचा भरपूर उपयोग करून घेऊन समाजांत स्वतंत्रपणें बुद्धिवादी रीतीनें विचार करण्याविरुद्ध वातावरण निर्माण करीत असतात. आपलें अप्रतिहत नेतृत्व व सत्ता टिकवण्यासाठीं हुकुमशाह व नेते समाजांतील व्यक्तींच्या विकारांना व भावनांना सिनेमा, वर्तमानपत्रें, भाषणें, पुस्तकें व शिक्षणसंस्था त्यांना प्रचाराचीं साधनें बनवून त्यांच्या द्वारा आवाहन करून आंधळेपणानें विश्वास ठेवण्याच्या वृत्ती लोकांत निर्माण करतात. एखादें असत्य असलें तरी तें शेकडों वेळां उच्चारून लोकांच्या मनांत इतकें ठसवितात कीं शेवटीं तें लोकांना सत्य वाटूं लागतें. हुकुमशाही राष्ट्रांत व्यक्तींनीं स्वतंत्रपणें विचार करावयास विरोध केला जातो. ज्या व्यक्ती स्वतंत्रपणें विचार करून आपलें मत प्रतिपादन करितात त्यांच्यावर कमालीचें नियंत्रण घातलें जातें. त्यांना तुरुंगांत डांबण्यांत येतें किंवा वेळ पडल्यास त्यांचे प्राणहि घेतले जातात.

## हुकुमशाही व सेंद्रियतेचा सिद्धान्त

हुकुमशाही प्रणाली ( Dictatorship ) ही सेंद्रियतेच्या किंवा प्राणिशीलतेच्या ( organic ) सिद्धान्तावर आधारलेली आहे. जसा एखादा प्राणी ( organism ) असावा व त्याला हात, पाय, कान, डोळे, पोट वगैरे अवयव असावेत तसेंच हुकुमशाही राष्ट्रांत समाज जिवंत, स्वतंत्र व एकसंध असा प्राणी मानला जातो व समाजांतील सर्व व्यक्ती त्याचे व म्हणून त्याच्यावर अवलंबून असणारे अवयव मानले जातात. म्हणजे ज्याप्रमाणें हात, पाय, कान, कान, नाक, डोळे, पोट या अवयवांना ते शरीराशीं अविभक्त असतांनाच जिवंत अस्तित्व असूं शकतें व जेव्हां ते शरीराशीं एकरूप असतात तेव्हांच त्यांना आपलीं कार्यें करतां येतात, त्याचप्रमाणें व्यक्ती समाजाचे अविभाज्य अवयव असतात व समाजाकडूनच त्यांचें संपूर्ण नियंत्रण होत असतें व झालें पाहिजे असें हुकुमशाहीवाले मानतात. एवढेंच नव्हे तर रूसो व बोझांकीसारखे तत्त्वज्ञ त्यांना तात्त्विक पायाहि देतात. ते म्हणतात कीं व्यक्तीचें मन हें समष्टीच्या मनाशीं

एकजीव असतें व समष्टिमनाचा भाग असतें. समष्टीचें मन व्यक्तीच्या मनोपेक्षां अधिक व्यापक असल्यानें तें निःस्वार्थी असतें व म्हणून समष्टीचें मन सांगेल तेंच खरें सत्य असतें व तेंच प्रत्येक व्यक्तीस खऱ्या अर्थानें हितकारक असतें. व्यक्तीला स्वतःचें स्वतंत्र अस्तित्व नसतें म्हणून तिनें समष्टीच्या मनाशीं विसंगत असा कोणताच विचार करूं नये. केल्यास तो खरा नसतो. व्यक्तीचें खरें हित कोणतें हें त्या त्या व्यक्तीस समजत नाहीं. कारण ती स्वार्थानें मर्यादित झालेली असते. म्हणून नैतिक दृष्टयाहि समष्टिमन व्यक्ती-मनापेक्षां श्रेष्ठ असतें. हें समष्टीचें मन त्या कालांतील सर्वोत्तम सामाजिक संस्थेचा म्हणजे शासनसंस्थे-( State ) चा जो नेता ( Dictator ) असेल त्यालाच समजतें व म्हणून सर्व दृष्टींनीं तो समाजांतील सर्व व्यक्तींपेक्षां श्रेष्ठ असतो. म्हणून व्यक्तींनीं कांहींहि विचार न करतां त्याचें अनुकरण केलें पाहिजे. या समष्टि-मनास रूसो General Will म्हणतो व बोझांकी त्याला Real will म्हणून ओळखतो. अशा हुकुमशाही राष्ट्रांत व्यक्ती ह्या हुकुमशाह्यांच्या हातांतील केवळ बाहुलीं बनतात. तेथें व्यक्तींना स्वतंत्रपणें विचार करण्याचा, मतप्रदर्शन करण्याचा व स्वतःचें हिताहित ठरविण्याचा यत्किंचित् अधिकार नसतो. हुकुमशाह म्हणेल तें सत्य म्हणून मानावेंच लागतें. मग तें व्यक्तीच्या बुद्धीस पटो वा न पटो. हुकुमशाहींत विचार व आचार यांच्या बाबतींत व्यक्तीस यत्किंचित्हि स्वातंत्र्य नसतें. व्यक्ति-स्वातंत्र्य शून्य असतें.

## लोकशाही व अणुसिद्धान्त

याउलट स्थिति लोकशाही समाजांत असते. लोकशाही समाज अणुसिद्धान्ता-( Atomism ) वर आधारलेला असतो. लोकशाही समाजांत व्यक्ती अणूं-सारख्या स्वतंत्र व विभक्त समजल्या जातात. अणूंच्या समुदायानें जशी एखादी वस्तू तयार होते त्याप्रमाणें स्वतंत्र व्यक्तींच्या एकत्रित जीवनानें समाज बनतो. वस्तु बनण्यांत जरी अणू एकत्र आले तरी त्यांत अणूंचें स्वतंत्र अस्तित्व नाहींसें होत नाहीं. त्यांच्या समन्वयानें किंवा सामूहिक जीवनानें नवीन वस्तू घडत असते. लोकशाही समाज व्यक्तिलक्षी असतो. त्यांत प्रत्येक व्यक्तीस स्वतंत्र अस्तित्व असतें असें मान्य केलें जातें. त्यांत प्रत्येक व्यक्तीस स्वतंत्रपणें विचार करतां येऊन सदसत् व इष्टानिष्ट यांचा विवेक करतां येतो व सर्वच बुद्धिशाली असल्यानें चांगल्या वस्तूंच्या बाबतींत सर्व सुबुद्ध माणसांचें एकमत घडत असतें व म्हणून त्याबाबतींत त्यांचें सहकार्य घडत असतें हें लोकशाही सिद्धान्तांत अध्याहृत असतें. लोकशाहींत समाजांतील व्यक्तीचें मत घेतलें जातें व शासनसंस्था लोकमतानुवर्ती असते. लोकांचे प्रतिनिधी शासनसंस्थेवर नियंत्रण घालीत असतात. लोकांच्या गरजानुसार लोकप्रतिनिधी कायदे घडवीत असतात व त्या कायद्यांची अंमलबजावणी लोकनियुक्त सरकार करीत असतें. लोकशाही समाजांत लोकमत जितकें प्रभावी असेल तेवढें अधिक नियंत्रण शासनसंस्थेवर लोक घालूं शकतात. लोकशाहीचें ध्येय लोककल्याण साधणें हेंच असतें. लोकशाहींत सार्वभौमत्व ( Sovereignty ) लोकांचें असतें. लोकशाही सरकार लोकांचें, लोकांसाठीं व लोकांकडून चालविलेलें असतें. लोकशाहींत व्यक्तींना बरेंचसें व्यक्तिस्वातंत्र्य असतें व समाजाचें नियंत्रण करण्याची अंतिम सत्ता लोकांकडे असते. व्यक्तींचा विकास करून त्यांच्या द्वारां अखिल समाजाचा विकास करणें हें लोकशाहीचें ध्येय आहे. लोकशाही ही खूपच उत्क्रान्त झालेली अशी आधुनिक प्रणाली आहे. ती केवळ राजकीय तत्त्वप्रणाली नसून ती एक जीवनप्रणाली आहे. लोकशाही समाजांत व्यक्तीस स्वतंत्रपणें विचार करावयास प्रोत्साहन दिलें जातें. लोकशाहींत विचार-स्वातंत्र्य, मतप्रदर्शन-स्वातंत्र्य व आचारस्वातंत्र्य असतें.

## भांडवलशाहींत व्यक्तीची गळचेपी

भांडवलशाहींत समाजाचें शासन भांडवलदारवर्ग करीत असतो. म्हणजे ज्या वर्गाच्या हातीं सामाजिक गरजांच्या वस्तूंच्या उत्पादनाचीं साधनें असतात तो वर्ग आपल्या पैशांच्या बळावर समाजाचें नियमन व नियंत्रण करूं शकतो व करीत असतो. प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें व्यक्तींना आर्थिक दृष्टया स्वतःवर अवलंबित ठेवून तो त्यांना लाचार बनवीत असतो व त्याचा फायदा घेऊन आपली सत्ता अनिर्बंधपणें त्यांच्यावर चालवीत असतो. समाजांतील बुद्धिमान् वर्गांतील थोर विचारवंतांना व अत्यंत चतुर, कार्य-








कुशल नि कार्यक्षम माणसांना वरच्या अधिकाराच्या, हुद्द्याच्या व भरपूर उत्पन्नाच्या जागा देऊन त्यांना तो आपल्या खिशांत घालीत असतो, आणि बाकीच्यांना लाचार करून ठेवून आपली सत्ता अप्रतिहतपणें वापरीत असतो. भांडवलशाही समाजांत पैशांनीं व्यक्तींचीं मतें विकत घेतलीं जातात व शेवटीं व्यक्तीहि जणुं खरेदी केल्या जातात. अशा समाजांत स्वतंत्र विचाराला व मुख्यतः स्वतंत्र आचाराला फारसा वाव राहूं शकत नाहीं. भांडवलशाही समाजांत व्यक्तिस्वातंत्र्याची भरपूर गळचेपी होत असते. भांडवलदार शास्ते लोकशाहीची यंत्रणा वापरून आपण लोकमतानुवर्ती आहोंत व लोकांच्या मताप्रमाणें व त्यांच्या कल्याणासाठीं आपण समाजाचें शासन करीत आहोंत असा आभास निर्माण करतात. अशी भांडवलवादी लोकशाही ( Capitalist Democracy ) बऱ्याच देशांत आढळते. जोंपर्यंत समाजांत आर्थिक विषमता राहून समाजाच्या कांहीं थरांचें आर्थिक शोषण चालू राहतें तोंपर्यंत त्या समाजांत खऱ्या अर्थानें 'व्यक्तिस्वातंत्र्य' निर्वेधपणें नांदत आहे असें म्हणतांच येत नाहीं. भांडवलशाही समाजांत व्यक्तींचें मतस्वातंत्र्य व कृतिस्वातंत्र्य जोंपर्यंत तें भांडवलदारांच्या व शासनकर्त्यांच्या आर्थिक व राजकीय हितसंबंधांना धक्का लावीत नाहीं तोंपर्यंतच सहन केलें जातें.

## समाजवाद व साम्यवाद

समाजवाद व साम्यवाद या विचारसरणी एकमेकांस फार जवळच्या अशा आहेत. परंतु सध्यांतरी रशिया व चीन या दोन राष्ट्रांत जी राजकीय तत्त्वप्रणाली नांदत आहे व जी कम्युनिझम् किंवा साम्यवाद या नांवानें ओळखली जात आहे; तिला हल्लींच्या समाजवादाचा कडवा विरोध आहे. समाजवादाचें एक निश्चित असें स्वरूप नाहीं. त्याचेहि अनेक प्रकार आहेत. पण सामाजिक गरजांच्या वस्तूंच्या उत्पादनाचीं साधनें समाजाच्या मालकीचीं असावींत व तीं एकूण समाजाच्या कल्याणासाठीं वापरलीं जावींत, तीं थोड्या धनपतींच्या खाजगी मालकीचीं असूं नयेत असें समाजवाद मानतो. त्याचप्रमाणें समाजवाद व्यक्तीस शासनसंस्थेच्या हातचें उपकरण किंवा साधन न समजतां व्यक्तीच्या 'व्यक्तिमत्त्वा'स स्वतंत्र किंमत देतो. समाजवाद व्यक्तिस्वातंत्र्याचें मूल्य ओळखतो व केवळ सुराज्य हें ध्येय न मानतां प्रत्येक व्यक्तीस स्वतंत्रपणें स्वतः विचार करण्याचें व तसा आचार करावयाचें स्वातंत्र्य असणें आवश्यक समजतो. समूहापुढें व्यक्ति कःपदार्थ आहे असें समाजवाद मानीत नाहीं, किंवा समूहाच्या किंवा समाजाच्या कल्याणासाठीं व्यक्तीच्या स्वतंत्र अस्तित्वाचा निरास करावा असें समाजवाद मानत नाहीं. उलट व्यक्तींच्या स्वतंत्र आचारविचारांतून व कल्याणांतून व सर्वांच्या अविरोधी सहकार्यांतूत सर्व समाजाचें कल्याण साधावयाचें हें त्याचें ध्येय आहे. समाजवाद एकाच्या कल्याणासाठीं दुसऱ्याचा बळी घेऊं इच्छीत नाहीं. समाजवाद व्यक्ति व समाज या उभयतांचें संपूर्ण कल्याण आपलें ध्येय समजतो.

## रशियांतील 'कामगारांची हुकूमशाही'

समाजवाद प्रचलित साम्यवादाचा पक्का विरोधक आहे. रशियांत साम्यवाद किंवा कम्युनिझमच्या नांवाखालीं कामगारांची हुकूमशाही ( Proletarian Dictatorship ) स्थापन झाली आहे व गेलीं २५ वर्षें ती अत्यंत कार्यक्षमपणें कार्य करीत आहे. तिनें रशियाला जगांतील प्रथम श्रेणीच्या रांगेंत आणून बसविलें आहे. रशियन साम्यवादांत सामुदायिक जीवनाचा पुरस्कार केला जातो व अखिल समाजाचें संपूर्ण जीवन वरच्या शास्त्यांकडून नियोजित केलें जातें. रशिया संघटित आर्थिक नियोजना- ( Planned Economy ) चा स्वीकार करतो. साम्यवादांत खाजगी मालमत्ता व भांडवलशाही यांचें संपूर्ण उच्चाटन करण्यांत येतें. वस्तूंचें उत्पादन नफ्यासाठीं न करतां तें लोकांच्या गरजांची पूर्ति करण्यासाठीं करण्यांत येतें. सर्व राष्ट्रीय उत्पादनाचीं साधनें शासनसंस्थेच्या मालकीचीं करण्यांत येतात. 'कुवतीप्रमाणें काम, गरजेप्रमाणें दाम' हें साम्यवादाचें ब्रीदवाक्य होय. त्यांत समाजाचें उत्पादन व विभाजन समानतेच्या तत्त्वावर आधारलेलें असतें व श्रमिकांकडून जें उत्पादन होतें तें त्यांच्या उपभोगासाठीं त्यांना शक्य तेवढ्या चांगल्या रीतीनें व गरजांप्रमाणें वांटलें जातें. रशियांत केंद्रवर्ती प्रबल असें सरकार आहे व तें समाजाच्या सर्व अंगांचें आर्थिक व राजकीय नियोजन ( Planning ) करीत असतें. प्रचलित रशियन राजवटींत सर्व व्यक्तींना कामास लावण्यांत येऊन बेकारी










व निरक्षरतां यांचा निरास करण्यांत आला आहे. सर्वांना शिक्षण व कामधंदा मिळतोच मिळतो व काम केल्याशिवाय कोणासहि त्या समाजांत जगतां येत नाहीं. त्या दृष्टीनें रशियांत संपन्नता, समृद्धि किंवा सुराज्य निर्माण करण्यांत आलें आहे. व्यक्तींना अत्यंत मर्यादित स्वातंत्र्य आहे. श्रमणाऱ्या जनतेच्या शारीरिक व बौद्धिक विकासासाठीं सर्व सुखसोयी रशियन साम्यवादानें निर्माण केल्या आहेत. सामुदायिक कल्याणाच्या नांवाखालीं नव्या साम्यवादी राजवटीनें रशियाच्या सर्वसामान्य जनतेवर राजकीय व आर्थिक गुलामगिरी लादली आहे, असा आरोप रशियावर केला जातो. रशियांत जी प्रचलित राजकीय प्रणाली आहे – म्हणजे जिला कम्युनिझम् म्हणतात तो बोल्शेविझम् आहे. सध्यांची रशियांतील कामगारांची हुकुमशाही हा खरा विशुद्ध किंवा निर्भेळ साम्यवाद आहे असा दावा रशियन साम्यवादी राज्यकर्तेहि करीत नाहींत. सध्यांची कामगारांची हुकुमशाही ही कम्युनिझमकडे जाण्याची प्राथमिक व प्रारंभिक अवस्था व पायरी आहे असें ते म्हणतात. खरा, शुद्ध किंवा निर्भेळ साम्यवाद तर एक प्रकारचा अराज्यवाद-( Anarchy )च असतो. कारण साम्यवादाचें अंतिम ध्येय वर्गविहीन समाज उभारून शासनसंस्थेचा अंत करणें व समाजांतील सर्व व्यवहार व्यक्तींच्या स्वयंप्रेरित व स्वेच्छेवर आधारलेल्या सहकार्यानेंच चालले पाहिजेत इतक्या अवस्थेपर्यंत माणसांची मानसिक व नैतिक उन्नति करण्याचें आहे. तें फारच दूरचें आहे. खऱ्या साम्यवादांत व्यक्ति व समाज यांच्यांत विरोधच राहणार नाहीं. समाजाच्या कल्याणांतच व्यक्तीचें कल्याण अन्तर्भूत असेल. पण ही अराज्यवादाची स्थिति कम्युनिझमची शेवटची अवस्था असेल. सध्यांतरी योजनाबद्ध समाजरचना रशिया व चीनमध्यें आहे. रशियाचें या बाबतींत असें म्हणणें आहे कीं शेजारीं सर्वत्र भांडवलशाही राष्ट्रें आहेत व तीं रशियासारख्या साम्यवादी राष्ट्राचा नायनाट करण्यासाठीं टपलेलीं आहेत. तेव्हां रशियाला म्हणा किंवा चीनला म्हणा गाफील राहून चालणार नाहीं. स्वतः सामर्थ्यसंपन्न व प्रभावी झाल्याशिवाय इलाजच नाहीं. आणि तें हुकुमशाहीशिवाय शक्य नाहीं. मात्र ही हुकुमशाही केवळ संक्रमणकालीन म्हणजे तात्पुरती असेल. ती कामगारांची व शेतकऱ्यांची असेल व ती त्यांच्याच कल्याणासाठीं वापरली जाईल. उद्देश मात्र एवढाच आहे कीं राष्ट्रांत एकी, घनता टिकवावी व विरोधकांचें म्हणजे भांडवलदारांचें संपूर्ण उच्चाटन केलें पाहिजे. कांहींहि असलें तरी जीवनाच्या सर्वच अंगांत रशियांत हल्लीं फारच मर्यादित व्यक्तिस्वातंत्र्य व्यक्तींना उपभोगायला मिळतें.

## सर्वोदयवादाचें यांत्रिक संस्कृतीविरुद्ध बंड

उलट, सर्वोदयवाद पूर्णपणें लोकशाही प्रवृत्तीचा आहे. सर्वोदयाच्या तत्त्वाप्रमाणें व्यक्ती व व्यक्तींचे गट यांनीं जास्तींत जास्त स्वयंपूर्ण बनलें पाहिजे व परावलंबन शक्य तेवढें टाळलें पाहिजे. परावलंबनानें व्यक्तिस्वातंत्र्य मर्यादित होतें. सर्वोदयवादाप्रमाणें व्यक्ती व व्यक्तींचे गट यांना खेड्यांच्या स्वरूपांत स्वयंपूर्ण केलें पाहिजे व त्यांचें स्वतःचें शासन त्यांनींच त्यांच्या पंचायतीमार्फत केलें पाहिजे. सामाजिक परावलंबन वाढलें कीं व्यक्तीची लाचारी वाढते व लाचारी वाढली कीं व्यक्तीस आपलें व्यक्तिस्वातंत्र्य टिकवितां येत नाहीं. व्यक्तीच्या विकासास व व्यक्तिस्वातंत्र्यास सर्वांत अधिक महत्त्व सर्वोदयवादांत दिलें जातें. सर्वोदयवाद अतिरेकी स्वरूपाचा आहे. व्यक्तीवर शासनसंस्थेचें व समाजाचें असणारें नियंत्रण कमींत कमी करण्यासाठीं सर्वोदयवाद आर्थिक व राजकीय बाबतींत 'विकेंद्रीकरणा'चा तोडगा सुचवितो. आर्थिक उत्पादनाचें व राजकीय सत्तेचें केंद्रीकरण झालें म्हणजे मग नाहीं म्हटलें तरी थोडया व्यक्ती सर्वसत्ताधीश बनतात व सबंध समाजांतील व्यक्तिस्वातंत्र्य नाहींसें होतें. सर्वोदयवाद, लहानलहान स्वयंपूर्ण खेडीं असावींत, त्यांच्या गरजा कमी असाव्यात व त्यांनीं इतरांवर फारच थोडया प्रमाणांत अवलंबून असावें, असें सांगतो. साहजिकपणें व्यक्तींचें स्वातंत्र्य टिकविण्यासाठीं सर्वोदयवाद फार मोठ्या यांत्रिकीकरणाला विरोध करतो व लहानलहान ग्रामोद्योगांना महत्त्व देतो. ग्रामोद्योगांत यंत्रांचा किंवा बाह्य शक्तीचा वा विद्युच्छक्तीचा वापर करावयाचा नसतो. या विचारसरणीप्रमाणें माणसाला आपल्या मूलभूत गरजा भागविण्यासाठीं, म्हणजे अन्नवस्त्र व निवारा यांची तरतूद करण्यासाठीं सबंध दिवस कामेंच करीत बसावें लागेल. त्यामुळें साधें काम करायलाहि मनुष्याला खूपच शक्ति खर्च करावी लागेल व तेंच तेंच काम अतिश्रमानें दररोज

त्याच कंटाळवाण्या रीतीनें खूप वेळ करीत बसण्यानें व्यक्तीस कंटाळा व मानसिक थकवा अधिक येण्याचीच अधिक शक्यता असते. आणि साध्या गरजा भागविण्यासाठीं व्यक्तीला एवढें काम करावें लागल्यानें व एवढा प्रदीर्घ कालावधि दवडावा लागल्यानें तिला फुरसद ( Leisure ) मिळूं शकणार नाहीं; आणि त्यामुळें स्वतंत्र विचार, लेखन, कलासर्जन, चिंतन यांची निर्मिति करण्यास उत्साह, वेळ, स्वास्थ्य व वाव राहणार नाहीं. विचार व कलासर्जन करणें यांतच मानवी-संस्कृतीचें सर्वस्व सामावलेलें असतें व मानवी संस्कृति टिकविण्यासाठीं व तिचें संवर्धन करण्यासाठीं सर्वोदय-वाद व्यक्तिस्वातंत्र्यास सर्वोत्तम महत्त्व देतो. व्यक्ती अशा प्रकारें एकसारख्या कामांतच राबत राहिल्या तर सर्वोदयाला अपेक्षित असलेल्या मानवी संस्कृतीचा विकास व्हावयास वावच राहणार नाहीं. ज्या यांत्रिक संस्कृतीविरुद्ध सर्वोदयवाद बंड पुकारूं पाहतो तोच यांत्रिकपणा, तोचतोचपणा व कंटाळवाणेपणा निराळ्या रीतीनें सर्वोदयवाद मानवी जीवनांत आणील. व्यक्तींना मुक्त आनंद मिळेनासा होईल व त्यामुळें मानवी जीवन खुरटून निरानंद, निरुत्साही बनण्याची व साधेपणाच्या नांवाखालीं समजांत रूक्षता, नीरसता व जडता येण्याची साधार भीति वाटते.

अर्थात् सर्वोदयवाद पुढें जाऊन म्हणतो कीं स्वतःच्या कामांतच आनंद निर्माण करून तो उपभोगायला शिकलें पाहिजे. गीतेंतील ' योगः कर्मसु कौशलम् ', ' स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ', ' स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ' इ० उक्तींचा आधार घेऊन सर्वोदयवाद सर्वसामान्य माणसाला त्याच्या इंद्रियप्रधान आनंदापासून दूर नेऊं पाहतो. कांहीं थोड्या तत्त्वज्ञान्यांना, साधकांना, तपस्व्यांना किंवा धार्मिक प्रवृत्तीच्या माणसांना कदाचित् हा आनंद आकर्षक वाटेल व त्यांत त्यांना जीवनाचें अन्तिम समाधान लाभेलहि. परंतु हल्लींच्या सर्वसामान्य मनुष्यास केवळ पोटापाण्याचीं कामें करण्यांत आपला सर्वच वेळ दवडणें नको असतें. त्याला फिरणें, वाचणें, लिहिणें, चर्चा करणें, गाणें, बजावणें, नाटकें करणें व पाहणें, चित्रें चितारणें, कलाकुसरीच्या वस्तूंची निर्मिति करणें, काव्यशास्त्रविनोद करणें, विश्रब्ध आलाप करणें, साहसाचीं व धाडसाचीं कामें करणें, खेळणें हेंच हवें असतें. हल्लींचा माणूस जसा आहे तसा गृहीत धरल्यास व आणखी कित्येक वर्षें तो तसाच राहणार आहे हेंहि मान्य केल्यास सर्वोदयवादाचा आदर्श हल्लींच्या माणसाच्या पचनीं पडण्यासारखा नाहीं व म्हणून तो साकार होणेंहि अशक्यप्राय आहे, असें म्हटल्यास वावगें ठरणार नाहीं. श्री-अरविंद म्हणतात त्याप्रमाणें माणसांत मूलभूत परिवर्तन झालें, 'मॅन'चा 'सुपरमॅन' झाला, मानवाचा अतिमानव झाला तर गोष्ट निराळी. परंतु हल्लींच्या माणसाची मूलभूत शारीरिक व मानसिक ठेवण व त्याच्या सहजप्रवृत्ती व त्यामुळें त्यावर पडणाऱ्या मानसिक मर्यादा या लक्षांत घेतां व थोड्या अपवादात्मक व्यक्ती बाजूस ठेवून सर्वसामान्य माणसाची कुवत लक्षांत घेऊन विचार करतां असें स्पष्ट दिसतें कीं सर्वोदयवादाचा आदर्श सर्वसामान्य माणसास झेंपण्यासारखा नाहीं. सर्वोदयवाद हा एक प्रकारचा अराज्यवादच आहे.

अराज्यवाद ( Anarchism ) कांहीं बाबतींत सर्वोदयवादासारखा आहे. तो कोणत्याहि प्रकारच्या संघटनेच्या विरुद्ध आहे. समाजाचें नियंत्रण कोणत्याहि बाह्य संस्थेच्या किंवा शासनसंस्थेच्या द्वारां न करतां तें व्यक्तींच्या स्वयंप्रेरित सदिच्छांनीं व स्वेच्छेवर आधारलेल्या सहकार्यानें झालें पाहिजे व त्यासाठीं व्यक्तींची नैतिक उन्नति खूपच झाली पाहिजे असें अराज्यवाद मानतो. समाजाच्या अंतिम आदर्शाविषयीं बहुतेकांत फारसे मतभेद नाहींत. मतभेद आहेत ते आधींच्या अवस्थेंत.

## व्यक्तिस्वातंत्र्याचा वस्तुनिष्ठ विचार

व्यक्तिस्वातंत्र्याचें स्वप्नरंजन करण्यांत अर्थ नाहीं. केवळ कल्पनेनें व्यक्तिस्वातंत्र्याची समस्या सोडवायची नाहीं. ती एक प्रत्यक्ष वस्तु असून समाजांत ती प्रत्यक्षांत कशी नांदवायची या दृष्टीनें तिचा पद्धतशीरपणें विचार व्हावयास हवा. व्यक्तिस्वातंत्र्याचा हल्लींच्या यंत्रप्रधान उत्पादनसाधनांच्या काळांत विचार करावयास पाहिजे. यंत्रांच्यामुळें व बाष्प व विद्युत् या प्रचंड कामें करणाऱ्या शक्तींच्यामुळें हल्लींच्या जगांत फार मोठमोठे भूप्रदेश एकमेकांशीं जोडले गेले आहेत. एका भूखंडांतील व्यक्ती आपल्या साध्या स्वरूपाच्या गरजांसाठींहि तेथून हजारों मैल अंतरावर असलेल्या भूखंडांतील लोकांवर अवलंबून राहतात. दळणवळणाचीं

साधनें इतकीं चांगलीं तयार झालीं आहेत कीं कांहीं थोड्या तासांत एके ठिकाणचा मनुष्य किंवा वस्तु किंवा विचार हजारों मैल अंतरावर जाऊन पोहोंचतो. रेडियो किंवा टेलिव्हिजन यामुळें तर कांहीं सेकंदांत हजारों मैलांवरच्या लोकांस आपणांस आपलें मनोगत कळवितां येतें. थोडक्यांत म्हणावयाचें झाल्यास यंत्रांमुळें सर्व जग आतां एक झालें आहे. प्रत्येक राष्ट्रांत कोट्यवधि लोक एकत्र राहतात. त्या सर्वांचें एकत्रित जीवन घर्षणरहितपणें, सुखानें व सहकार्यानें चालविण्यासाठीं व त्या सर्वांना एकत्र ठेवून सर्वांचे व्यवहार सहकार्यानें, सुसूत्रपणें व शिस्तीनें चालविण्यासाठीं सर्वांना एकत्र बांधणारी अशी शक्ति व संस्था असणें अपरिहार्य आहे. देशांतील रेल्वे, टपाल, विमानें, रेडिओ, व्यापार, कारखाने, शिक्षणसंस्था, बँका इ. सर्व दररोज सुरळितपणें चालविण्यासाठीं कोणती तरी केंद्रीय शक्ति किंवा संघटना असल्याशिवाय समाज कांहीं मिनिटेंसुद्धां चालणार नाहीं. शासनसंस्था (State) नाहींशी किंवा कमजोर झाल्यास समाज कोलमडून पडून त्याच्या ठिकऱ्या उडाल्याशिवाय राहणार नाहींत. व्यक्तींच्या आपापसांतील संबंधांवरहि नियंत्रण ठेवण्यासाठीं शासनसंस्थेपाशीं लष्करी बळाचीहि आवश्यकता आहे. कारण आज माणसें भरदिवसां प्रत्यक्ष भावाबहिणींचे, पतिपत्नींचे, शेजाऱ्यापाजाऱ्यांचे खून करावयास कचरत नाहींत. यःकश्चित् बाबीसाठींहि जोंपर्यंत माणूस माणसाच्या नरडीच्या घोट घ्यावयास कचरत नाहीं तोंपर्यंत शासनसंस्था, तिची शक्ति व वर्चस्व कमी करणें शक्यहि नाहीं व इष्टहि नाहीं. निदान आजचा मनुष्य आहे तसा लक्षांत घेतां समाजांत कायदा, सुव्यवस्था, शांतता, ऐक्य, सहकार्य व शिस्त हीं टिकविण्यासाठीं शासनसंस्थेच्या अस्तित्वाची नितांत आवश्यकता आहे हें नाकारण्यांत अर्थ नाहीं. भविष्यकाळीं शिक्षण, संस्कृति, विचार यांनीं मानव उत्क्रान्त झाला, सुधारला व समाजांत घातक कृत्यें करण्याची वृत्ति त्याच्यांतून नामशेष झाली तर आपोआपच शासनसंस्थेची आवश्यकता कमी कमी भासूं लागेल. पण पुढें केव्हांतरी हें कदाचित् होणार असेल तर म्हणून आज शासनसंस्था कमकुवत करणें किंवा नाहींशी करणें हें शहाणपणाचें ठरणार नाहीं. आणि कदाचित् माणूस नैतिक दृष्ट्या खूपच उन्नत झाला तर फारतर शासनसंस्था लष्करी शक्ति वापरणार नाहीं. तरीपण समाजांतील विविध व्यापार व व्यवहार यांच्या एकसूत्रीपणासाठीं व सुव्यवस्थित योजनेसाठीं त्यावेळींहि शासनसंस्थेची जरूर भासल्याशिवाय राहणार नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीनें असें म्हणतां येईल कीं त्या वेळची शासनसंस्था व्यक्तींवर हल्लींसारखीं बंधनें लादून व्यक्तींचें स्वातंत्र्य हिरावून घेणार नाहीं. पण ती व्यक्तीव्यक्तींमधील असंख्य जीवनव्यवहार व्यक्तींच्या स्वयंस्फूर्त सहकार्याचा उपयोग करून घेऊन घर्षण टाळून, व समाजजीवनांत एकसूत्रीपणा व पद्धतशीरपणा आणून समाजजीवन शांततेनें व सलोख्यानें चालविण्यास व्यक्तींना मदत करील व तिचें कार्य समाजास व व्यक्तींस अपायकारक न ठरतां आशीर्वादरूपच ठरेल.

शेवटीं एवढेंच म्हणतां येईल कीं व्यक्तिस्वातंत्र्याचा प्रश्न दिसायला साधा वाटत असला तरी तो फारच गहन व गुंतागुंतीचा आहे. तो सहजासहजीं समाधानकारकपणें सुटण्यासारखा नाहीं. व्यक्तीचें समाजावरील अवलंबन, मानसिक दौर्बल्य, स्वतंत्रपणें बुद्धि वापरून विचार करण्याविषयींची तिची अनास्था, विकारवशता, सहानुभूति, अनुकरणशीलता व सूचनक्षमता यांच्या प्रभावानें वागण्याची प्रवृत्ति, स्वार्थी व संकुचित वृत्ति, धन व सत्ता यांची अभिलाषा व त्यामुळें तिच्या स्वातंत्र्यावर विविध प्रकारांनीं पडणाऱ्या मर्यादा या सर्वांचा सूक्ष्मपणानें विचार करूनच हा प्रश्न सोडवावा लागेल. या प्रश्नाच्या गुंतागुंतीमुळें व्यक्तिस्वातंत्र्य व समाजांतील विविध सामाजिक संस्था व शासनसंस्था यांचें व्यक्तींवर चालणारें नियंत्रण हीं परस्परास घातक व अपायकारक न ठरतां त्यांची यशस्वी रीत्या कशी जुळणी करावयाची व त्यांचा समन्वय कसा घडवून आणावयाचा हा सध्यांचा 'यक्षप्रश्न' होऊन राहिला आहे. व्यक्तिस्वातंत्र्य आणि सामाजिक संस्था व शासनसंस्था यांचें व्यक्तीवर राहणारें नियंत्रण याचें स्वरूप कसें असावें व परस्परांच्या मर्यादा कोणत्या असाव्यात याचें समर्पक उत्तर कदाचित् भविष्यकालच देऊं शकेल.

प्रा. अ. ना. देशपांडे

# साहित्यशास्त्रांतील प्रश्न आणि सामाजिक दृष्टि

साहित्यिकाच्या आणि कलावंताच्या व्यक्तित्वाच्या सामाजिकतेची स्पष्ट जाणीव श्री. दि. के. बेडेकर यांच्या ' **साहित्यः निर्मिति व समीक्षा** ' या पुस्तकांत अत्यंत परिणामकारक स्वरूपांत व्यक्त झालेली आहे. आणि विशेष हें कीं बेडेकरांनीं कलेचीं स्वतंत्र मूल्यें मान्य करून सुद्धां कलावंताच्या व्यक्तित्वाच्या सामाजिकतेची अपरिहार्यता उत्तम रीतीनें पटवून दिलेली आहे. कलेचं मूल्यमापन कलेच्याच मूल्यांनीं झालं पाहिजे, ज्ञानाचीं व नीतीचीं मूल्यं तेथें उपयोगांत आणूं नयेत, हें त्यांनाहि मान्य आहे, पण ज्ञान व नीति यांच्या परिमाणांहून कलेचीं परिमाणें वेगळीं असलीं तरी या तिन्ही क्षेत्रांतील परिमाणें हीं सामाजिकच आहेत, या तिन्ही क्षेत्रांतील निर्मिति ही मानवसापेक्ष म्हणून परस्परसंबंधित आहे, हें ज्ञान, नीति व कला या तिघांच्याहि मुळाशीं असलेलें जीवनाचें अधिष्ठान त्यांनीं निदर्शनास आणून दिलें आहे. मानव-जीवन हाच या तिघांच्याहि आकलनाचा विषय आहे. या तिन्ही क्षेत्रांत काम करणाऱ्यांच्या पुढें एकच वास्तव आहे. एकाला त्या वास्तवांतल्या तर्कनिष्ठ कार्यकारणभावाची प्रतीति येते, दुसऱ्याला त्या वास्तवांत नैतिक कार्यकारणभावाचें दर्शन होतें आणि तिसऱ्याला त्यांत कलात्मक लयीचा साक्षात्कार होतो. तिघांना होणारी ही वास्तव प्रतीति सकृत्-दर्शनीं परस्पराहून भिन्न दिसत असली तरी ती सूक्ष्म दृष्टीनें पाहूं जाता परस्परसंबद्धच असते. ही गोष्ट इतकी स्पष्ट आणि स्वयंसिद्ध आहे की ती पटवून देण्याची तसं पाहूं जातां कांहीं आवश्यकता वाटूं नये. पण अलीकडे मराठी वाङ्मयांत, आम्हांला प्रतीत होणारं वास्तव हें समाजशास्त्रज्ञांना, नीतिशास्त्रज्ञांना, विज्ञानवंतांना आणि जीवनाच्या इतर विविध क्षेत्रांत कार्य करणाऱ्यांना प्रतीत होणाऱ्या वास्तवाहून अगदींच वेगळं आणि अलौकिक कोटींतलं असतं, असा दावा मांडणाऱ्या अबोधवादी साहित्यिकांचा संप्रदाय बरीच प्रतिष्ठा मिळवूं लागला आहे. अबोधवाद्यांचा हा दावा त्यांच्या असामाजिकतेचा निदर्शक असून शिवाय कसा भ्रामक आणि असयुक्तिक आहे हें सिद्ध करण्याची महत्त्वाची कामगिरी बेडेकरांनीं यशस्वी रीतीनें पार पाडलेली आहे.

### कलात्मकतेचा गाभा नवनिर्मितीमध्यें

कलानिर्मितीमध्यें कलावंताच्या स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाची बूज अवश्य राखली पाहिजे; पण त्याचबरोबर या निर्मितींत व्यक्तिमत्त्व आणि वास्तव हे दोन्ही घटक कसे कार्यक्षम होतात हेंहि लक्षांत घेतलं पाहिजे. कवीचं "मन हें मुळांत आत्मनिष्ठ असूनहि वास्तवाशीं तादात्म्य पावून त्याचा ' आकार ' घेऊं पाहतें; उलट, वास्तव हें आपली मूळ ' बाह्यार्थां'ची स्थिति सोडून कविमनाच्या 'आकारा'चा आशय बनूं पाहतें. या परस्पर-प्रक्रियेंतून कलाकृतीचा जन्म होतो." कलानिर्मितीमध्यें अशा रीतीनें व्यक्तित्व आणि वास्तव यांचें द्वंद्व असतें. व्यक्तित्व आणि वास्तव या दोघांनाहि कलानिर्मितींतील क्रियाशील घटक मानल्यानंतर, कलानिर्मितींत कलावंताचें व्यक्तित्वच तेवढें कार्यक्षम असतें आणि वास्तव मात्र जड व निष्क्रिय असतें असें समजणारे पु. य. देशपांडे आणि कलानिर्मितींत वास्तवच तेवढें क्रियाशील असतें व कलावंताचें मन वास्तवाचें नुसतें प्रतिबिंब उमटविण्याचें कार्य करतें असें समजणारे लालजी पेंडसे या दोघांचीहि विचारसरणी कशी एकांगी आहे याची आम्हांस साक्ष पटते. कलानिर्मितीसंबंधीचा बेडेकरांचा हा सिद्धान्त तर महत्त्वाचा आहेच; पण कलेचं व्यवच्छेदक लक्षण निश्चित करण्यासंबंधीं त्यांनीं मांडलेली विचारसरणी अधिक महत्त्वाची आहे. ' कलेचं कार्य काय ? ' असा प्रश्न विचारल्यानंतर, सर्वसाधारणपणें, आनंद देणें, हें उत्तर देण्यांत येतें. हें उत्तर उघड उघड अत्यंत मोघम आणि अतिव्याप्त आहे; कारण आनंद देणें हें कांहीं कलेचंच खास लक्षण होऊं शकत नाहीं. कलावंताला निर्मितीच्या वेळीं होणारा आनंद आणि रसिकाला रसास्वादसमयीं

' गेल्या वर्षांतील टीकावाङ्मय ' या विषयावर प्रा. अ. ना. देशपांडे यांनीं महाराष्ट्र-साहित्यपरिषद्, पुणें येथें ३-१२-१९५४ रोजीं जें व्याख्यान दिलें त्याचा हा उत्तरार्ध लेखरूपानें येथें दिला आहे. पूर्वार्ध ' नवभारता ' च्या गेल्या मार्चच्या अंकांत प्रसिद्ध झालाच आहे. हें व्याख्यान ' नवभारता 'स प्रस्तुत लेखरूपानें दिल्याबद्दल प्रा. अ. ना. देशपांडे व महाराष्ट्र साहित्य-परिषद्, पुणें यांचे आभार. — का. सं.








लाभणारा आनंद हा त्यामुळें समीक्षाशास्त्रांत गौण मानला जावा असें बेडेकरांनीं सुचविलें आहे. कलात्मकतेचा गाभा नवनिर्मितीमध्यें असतो, हें त्यांना सांगावयाचें आहे. ही नवनिर्मिति कोणती ? वाङ्मयामध्यें मनोविकारांना वेगळें अर्थरूप प्राप्त होतें. ही अर्थरूपाची निर्मिति म्हणजेच कलेंतली नवनिर्मिति. ही नवनिर्मिति, ही कलात्मक कल्पना म्हणजेच कलावंताचा आत्मप्रत्यय असतो; तींत त्याचें व्यक्तित्व प्रतिबिंबित झालेलें असतें. त्यामुळें विशिष्ट कलाकृतीची योग्यता ठरवितांना ती निर्माण करणाऱ्यांचें व्यक्तित्व कसें व कितपत विकसित झालें आहे हें पाहावें लागतें.

### मर्ढेकरांच्या व्यक्तित्वाचें विश्लेषण

बेडेकरांनीं **मर्ढेकरांच्या कवितेचें** मूल्यमापन करतांना कवीच्या व्यक्तित्वाचें विश्लेषण केलें आहे. आणि विफलता, अगतिकता आणि उगीचता या त्रिदोषांत त्यांना मर्ढेकरांच्या व्यक्तित्वाचें वैशिष्ट्य सांपडलें आहे. पराकोटीची अश्रद्धा ही मर्ढेकरांची जणु प्रकृति आहे. आत्यंतिक असामाजिकता हा त्यांच्या प्रतिभेला लागलेला शाप आहे. मानवाला क्षुद्र समजणाऱ्या या मर्ढेकरांत **धोंडो विठ्ठल देशपांडे** यांना मात्र उच्च व आशावादी कवित्वाचें दर्शन झालें आहे. धोंडोपंतासारखा कुशल समर्थक लाभावा ही खरोखर मर्ढेकरांच्या दृष्टीनें परम भाग्याची गोष्ट आहे. धोंडोपंतांच्या मतें मर्ढेकर हे तुकाराम, ज्ञानेश्वर, नासदीय सूक्ताचा द्रष्टा प्रजापति यांच्या श्रेणींत बसणारे आहेत. धोंडोपंत सांगतात कीं मर्ढेकरांचा परमेश्वरावर उदंड विश्वास आहे आणि त्याचबरोबर हेंहि सांगतात कीं मर्ढेकरांच्या ईश्वरनिष्ठेला तडे गेलेले आहेत. धोंडोपंत सांगतात की मर्ढेकरांच्या कवितेंत बंडखोरीचा सूर आहे म्हणजे मानवाच्या सामर्थ्याची जाणीव आहे; तेच धोंडोपंत सांगतात कीं मानवाचें स्थान विश्वचक्रांत अगदी क्षुल्लक आहे अशी मर्ढेकरांची समजूत आहे. धोंडोपंत सांगतात कीं मर्ढेकर तत्त्वज्ञ आहेत. तेच धोंडोपंत सांगतात कीं मर्ढेकर माकड आहेत. मर्ढेकरांच्या व्यक्तित्वाचें असें मोठें गमतीचें पण मूलगामी विश्लेषण **धोंडोपंतांनीं 'सत्यकथे'**मधील आपल्या तीन लेखांकांतून केलें आहे. सर्वसामान्य वाचकाची मर्ढेकरांच्या कवितेसंबंधींची प्रतिक्रिया धोंडोपंतांच्या प्रतिक्रियेहून वेगळी आहे पण बेडेकरांच्या तत्संबंधींच्या प्रतिक्रियेशीं मात्र जुळणारी आहे. मर्ढेकरांची कविताहि विफलतावादी आहे ही ती सर्वसाधारणांची प्रतिक्रिया आहे. धोंडोपंत म्हणतात कीं 'या विफलतेबद्दल तुम्ही मर्ढेकरांना कां जबाबदार धरतां ? समाजांत जर सर्वत्र विफलता आहे तर मग ती मर्ढेकरांच्या कवितेंत राहणारच. आज समाजांत विफलता आहे म्हणून मर्ढेकरांच्या कवितेंत विफलता आहे." असेल समाजांत विफलता; पण या विफलतेविरुद्ध बंड करण्याची, या विफलतेच्या दर्शनानें संतप्त होण्याची आणि या विफलतेवर मात करण्याकरितां लोकांना चेतविण्याची वृत्ति मानवतेबद्दल प्रेम व सहानुभूति असणाऱ्या कवीच्या अंतःकरणांत असूं नये काय ? ही वृत्ति मर्ढेकरांत नाहीं, तरी सुद्धां ते स्वतःशीं अत्यंत प्रामाणिक आहेत एवढ्या एका गुणाच्या बळावर त्यांचें व्यक्तित्व गौरवास पात्र समजावें काय ? मर्ढेकर 'उत्साहवर्धक, चैतन्यदायक, धैर्योत्पादक, स्फोटक कविता लिहूं शकत नाहींत' ही काय अभिनंदनीय गोष्ट आहे ? याचाच अर्थ असा की समाजांत या कवीला कोठेंच उत्साहाचें, धैर्याचें, चैतन्याचें, दर्शन होत नाहीं. मर्ढेकरांच्या या विफलतावादी कवितेची प्रतिक्रिया समाजाला अधिक विचारप्रवण करण्यांत होईल या **डॉ. ना. ग. जोशी** यांच्या आशावादाशीं (**'सत्यकथा'** जानेवारी १९५४) सहमत होणें कठीण आहे; एवढेंच नव्हे तर, मर्ढेकरांच्या कवित्वाच्या मागें एक समृद्ध व्यक्तिमत्त्व आहे हें मान्य करण्यालाहि माझें मन कचरत आहे. 'सूक्ष्म बुद्धिमत्ता, चोखंदळ रसिकता व तरल भावुकता' हे मर्ढेकरांच्या व्यक्तित्वाचे गुण माहीत असूनहि, या गुणांपेक्षांहि अधिक प्रमाणांत त्या व्यक्तित्वांत जो भेदक उपरोध आहे, जी उग्र अहंता आहे, मानवाविषयींची जी कमालीची तुच्छतेची वृत्ति आहे, त्यामुळें सामाजिकतेच्या दृष्टीनें व्यक्तित्वाचें मूल्यमापन करूं इच्छणाऱ्यांना त्या व्यक्तित्वांत विशेष आदरार्ह असें कांहीं आढळणें कठीण आहे. व्यक्तित्वाच्या मूल्यमापनांत ही सामाजिकतेची भूमिका श्री. बेडेकरांनीं फारच कटाक्षानें आणि समजपूर्वक पाळलेली आहे. गंगाधर गाडगीळ व अरविंद गोखले यांच्या कथांच्या परीक्षणांत त्यांच्या या सामाजिक दृष्टीचा उत्तम प्रत्यय येण्यासारखा आहे.



अनुक्रमणिका






## सामाजिक दृष्टीचा निकष

सामाजिकतेची दृष्टि आली म्हणजे विवेचनांत कसा फरक पडतो हें पाहावयाचें असल्यास करुणरसावरील बेडेकरांचा लेख, ' **रस सुखरूप की दुःखरूप ?** ' हा **ग. त्र्यं. देशपांडे** यांचा लेख ( 'छंद' नोव्हेंबर-डिसेंबर १९५४ ) व ' **करुणरसापासून आनंद कां होतो ? ?** ' हा **मनोहर माधव आळतेकर** यांचा '**रचने**'तला (जुलै १९५४) लेख हे लेख एकत्र वाचून पाहावे. ग. त्र्यं. देशपांडे व अळतेकर यांचें विवेचन व युक्तिवाद हे पारंपरिक स्वरूपाचे आहेत; शास्त्रजड आहेत. बेडेकरांनीं मात्र , " शोकनाट्यांतील धीरोदात्त नायक-नायिका मानवी ध्येयवादाचा व तेजस्वितेचा आदर्श निर्माण करून आपल्या आत्माहुतीनें स्वतःला व समाजाला पूर्णत्वाकडेच नेतात , समाजाचें ' संभरण ' करतात " असा शोककाव्यांतील उदात्त सामाजिक आशय स्पष्ट करून दाखविला आहे.

रसावरील ' **रस म्हणजे काय ?** ' हा **प्रा. वा. ल. कुलकर्णी** यांचा लेख व '**रससिद्धान्ताचें भारतीय स्वप्न**' हा **बेडेकरांचा** ' **लोकमान्यां**'च्या या वर्षाच्या दिवाळी अंकांतला लेख यांचीहि या दृष्टीनें तुलना करून पाहतां येण्यासारखी आहे. कुलकर्ण्यांच्या रसविषयक विवेचनाला समाजशास्त्रीय दृष्टीचें रतिमात्रहि अधिष्ठान नाहीं; उलट, रससिद्धान्ताचें विवेचन करतांना तो भारतीय विचारविश्वाचा कसा एक घटक आहे , रसाची आठ ही संख्या निश्चित करतांना भरतमुनींनीं भारतीय परंपरा कशी सांभाळली आहे , याचा विचार करून रसव्यवस्थेच्या अंतर्यामांत असलेल्या जीवननिष्ठेचा शोध घेण्याचा श्री. बेडेकरांनीं प्रयत्न केलेला आहे. समाजशास्त्रीय दृष्टि अंगवळणीं पडलेली नसली म्हणजे भारतीय साहित्यशास्त्राचा व्यापक दृष्टीनें विचार करणाऱ्याच्या विवेचनांतली व्यापकता ही कशी नाममात्र स्वरूपाची राहते, याचा प्रत्यय आपणांस **ग. त्र्यं. देशपांडे** यांचा '**मातृभूमी**'च्या दिवाळी अंकांतला ' **भारतीय साहित्यशास्त्राचें व्यापक क्षेत्र**' हा लेख वाचतांना येतो. देशपांड्यांना प्रतीत झालेली भारतीय साहित्यशास्त्राची व्यापकता एवढीच आहे कीं , भामहापासून तों जगन्नाथापर्यंतच्या साहित्यशास्त्रज्ञांनीं शास्त्रविवेचन करतांना तें केवळ संस्कृत वाङ्मयापुरतेंच मर्यादित ठेवलें नाहीं , त्यांनीं प्राकृत , अपभ्रंश व देशभाषा यांतील वाङ्मयाचाहि परामर्श घेतलेला आहे. वस्तुतः ही गोष्ट मुद्दाम सांगण्यासारखी आहे असें नाहीं; कारण साहित्यशास्त्रांतले सिद्धान्त हे कांहीं विशिष्ट भाषेंतल्याच वाङ्मयापुरतेच मर्यादित असतात असें म्हणतां येत नाहीं. पण निव्वळ साहित्यशास्त्रीय विचाराच्या व्यापकतेची उडी अर्थात् एवढीच राहणार. उमरावतीचे वैद्य **श्री.पु. हिर्लेकर** हेहि संस्कृतांतल्या साहित्यशास्त्राचे एक साक्षेपी अभ्यासक आहेत. या अभ्यासाचा उपयोग करूनच, त्यांनीं ' मराठीचें साहित्यशास्त्र ' या पुस्तकांतील भक्तिरससंबंधींचें समग्र विवेचन कसें शास्त्रदुष्ट आहे हें साधार सिद्ध करून दाखविलें आहे. अर्थात् हिर्लेकरांचीहि दृष्टि ग. त्र्यं. देशपांड्यांच्याप्रमाणें विशिष्ट मर्यादेंतच कार्यक्षम व प्रभावी राहिलेली आहे.

साहित्यशास्त्रीय प्रश्नांच्या अभ्यासाला इतर शास्त्रांच्याहि अभ्यासाची जोड मिळणें अत्यंत आवश्यक आहे. साहित्याच्या निर्मितीला कारणीभूत होणारी व्यक्तित्व ही जी मुख्य शक्ति आहे, तिचें स्वरूप यथार्थ रीतीनें व पूर्णपणें कळण्याकरितां त्याचा मानसशास्त्रीय व समाजशास्त्रीय अशा दोन्ही दृष्टिकोनांतून विचार झाला पाहिजे. आपल्या मराठींत साहित्यशास्त्रीय प्रश्नांच्या विवेचनाकरितां मानसशास्त्राचा पुष्कळच मोठ्या प्रमाणावर उपयोग करण्यांत आलेला आहे; पण समाजशास्त्रीय दृष्टीनें केलेल्या अभ्यासाची उणीव मात्र अत्यंत तीव्रतेनें जाणवण्यासारखी आहे.

या दृष्टीनें इंग्रजींतला एक विराट् प्रयत्न येथें मुद्दाम उल्लेखिण्यासारखा आहे. मानसशास्त्रीय आणि समाजशास्त्रीय अशा दोन्ही दृष्टिकोनांतून वाङ्मयनिर्मितीला प्रेरक होणाऱ्या शक्तींचें अत्यंत मूलगामी विवेचन करणारा इंग्रजींतला ख्रिस्टोफर कॉडवेलचा 'Illusion and Reality ' हा ग्रंथ आपणांस परिचित आहेच. **बेडेकरांनीं** '**मराठवाडा** ' मासिकाच्या दिवाळी-अंकांतून या अत्यंत प्रतिभाशाली अशा साहित्यशास्त्रज्ञाच्या या ग्रंथाचा परिचय करून दिलेला आहे; पण हा परिचय अत्यंत त्रोटक आणि असमाधानकारक आहे; कॉडवेलच्या विचारसृष्टीचें पुरेसें दर्शन घडविण्याच्या दृष्टीनें त्याची उपयुक्तता बेताचीच आहे. अर्थात् समाजशास्त्रीय दृष्टि कशी वापरावी याची दीक्षा घेण्याकरितां आपणांस कॉडवेललाच शरण जाण्याची आवश्यकता नाहीं; कारण समाजशास्त्रीय दृष्टि ही मराठी








वाङ्मयाला सर्वस्वीं नवीन अशी गोष्ट नाहीं. डॉ. केतकरांनीं वैदिक वाङ्मयाच समाजशास्त्रीय दृष्टिकोनांतून केलेलें विवेचन सुप्रसिद्धच आहे. ही दृष्टि सुजाणपणें व सुबुद्धपणें मराठींतल्या साहित्यविषयक प्रश्नांच्या बाबतींत वापरण्याचें व मराठींतील समीक्षाशास्त्राला नवें विधायक वळण लावण्याचें मुख्य श्रेय श्री. दि. के. बेडेकर यांचें आहे.

## कलानिर्मिति ही समाजसापेक्ष प्रक्रिया

वाङ्मयाच्या आणि वाङ्मयनिर्मात्याच्या व्यक्तित्वाच्या सामाजिकतेची ज्यांना सुस्पष्ट जाणीव आहे अशा साहित्यविवेचकांमध्यें सौ. कुसुमावती देशपांडे यांचेंहि स्थान फार वरचें आहे. त्यांच्या टीकालेखांचा 'पासंग' हा नुकताच प्रसिद्ध झालेला संग्रह त्यांच्या या जाणीवेची साक्ष देण्यास समर्थ आहे. त्यांनीं आपल्या वाङ्मयतत्त्वविवेचनांत कलेच्या सामाजिकतेवर विशेष भर दिलेला आहे. 'नवभारतांतील कला' या लेखांत त्यांनीं असें स्पष्ट म्हटलें आहे कीं "जीवनमूल्यांची राखण करणें, त्याविषयीं मानवी मनाला सदैव जागृत ठेवणें, मानवी सहृदयतेची जपणूक करणें, मानवी मनाला आकुंचित, क्षुद्रवृत्ति बनूं न देणें, अश्मप्राय होऊं न देणें हें कलेचें मुख्य कार्य आहे." प्रतिभेचें मूळचें देणें हें निसर्गदत्त आहे हें त्यांना मान्य आहे. पण प्रतिभेचें मूर्त स्वरूप सामाजिक परिस्थितीनं व तत्कालीन वैचारिक वातावरणानं फार मोठ्या प्रमाणावर निश्चित केलं जातं अशी त्यांनीं स्पष्ट कबुली दिलेली आहे. कलावंतांवर, कवींवर त्यांनी फार मोठी जबाबदारी टाकलेली आहे. आगामी नवोन्मेषशाली युगाच्या निर्मितीला पोषक अशी गतिमान्, उत्कट व प्रभावशाली वृत्ति निर्माण करणं हें आजच्या कवींचं निश्चित व महत्त्वाचं कार्य आहे असं त्यांनीं निक्षून सांगितलं आहे. सौंदर्याचें त्यांनीं जें विवेचन केलें आहे त्यांत सुद्धा त्यांच्या सामाजिक दृष्टीचे प्रभावी पडसाद उमटले आहेत. सुसंवाद हा सौंदर्याचा आत्मा आहे असं वा. ल. कुळकर्णी यांनीं म्हटलेलं आहे. सौंदर्य म्हणजे एका विशिष्ट इंद्रियसंवेदनेंतच रंगवून टाकणारी शक्ति अशी मर्ढेकरांची विचारसरणी आहे. या दोघांचीहि विचारसरणी उघडउघड जीवनविन्मुख स्वरूपाची आहे. कुसुमावतीबाईंनीं या विचारसरणींवर आपलें भाष्य करतांना लिहिलें आहे की "सत्य, सौंदर्य, शिव हीं जीवनाचीं त्रिगुणात्मक अंगें आहेत. तीं सर्व जीवनसापेक्ष आहेत; मानवाच्या अखंड व अनंत अशा जीवनप्रयोगांतून तीं उदयास आलीं आहेत. यांपैकीं प्रत्येकाची प्रतीति व्यक्तिव्यक्तीला स्वतःच्या अंतरंगाच्या खोल गाभाऱ्यांतच येऊं शकते; पण ही व्यक्तिगत प्रतीति त्या त्या व्यक्तीच्या सांस्कृतिक संचितानें रंगलेली असते. त्या सांस्कृतिक संचितांतून ती निर्माण झालेली असते. म्हणून सौंदर्याची प्रतीति हा जसा एक व्यक्ति-वस्तु-संबंध आहे तसेंच तिचें स्वरूप व्यक्तिसमष्टिसंबंधावरहि अवलंबून असतें." कलेंत प्रकट होणारं कलावंताचं व्यक्तित्व ही सामाजिक वस्तु आहे हें लक्षांत घेतल्यानंतर कुसुमावतीबाईंनीं सौंदर्यासंबंधीं म्हणजेच कलानिर्मितीसंबंधीं केलेलं हें विवेचन यथार्थ म्हणूनच ग्राह्य ठरतें. म्हणून पुन्हां एकदा ठांसून सांगावेंसें वाटतें की कलानिर्मिति ही एक समाजनिरपेक्ष प्रक्रिया आहे असं समजणं म्हणजे कलानिर्मितीच्या खऱ्या स्वरूपाविषयीं घोर अज्ञान प्रकट करण्यासारखं आहे. या ठिकाणीं कॉडवेलच्या पुस्तकाचं स्मरण होणं स्वाभाविक आहे. जागृत जनता बूर्झ्वा क्रांतिवाद्यांना उद्देशून बोलत आहे अशी त्यानं कल्पना केलेली आहे. ती त्यांना म्हणत आहे: "There is no neutral world of art, free from categories or determining causes. Art is a social activity. Yours is the fallacious freedom of dream, which imagines itself spontaneous when it is rigidly determined by forces outside consciousness". कॉडवेलच्या ग्रंथांतील ओळी उद्धृत केलेल्या पाहून कांहीं जण कदाचित् बिचकले असतील; कारण तो कम्युनिस्ट आहे. पण त्यांच्या दृष्टीनं आनंदाची बातमी ही कीं तो परदेशांतला कम्युनिस्ट आहे. कलानिर्मितीच्या प्रक्रियेंतील अपरिहार्य स्वरूपाची सामाजिकता कम्युनिस्टांकडूनच प्रचारिली जाते असं नाहीं. नुकतेच आपल्या देशांत आलेले ब्रिटिश कवि स्टीफन स्पेंडर यांनींहि कलेच्या समाजसापेक्ष स्वरूपावर भर दिलेला आढळून येतो. त्याकरितां पुरावा म्हणून दिल्ली येथें कांहीं दिवसांपूर्वीं झालेल्या त्यांच्या भाषणाचा एका










प्रसिद्ध इंग्रजी पत्रांतला छोटासा अवाहलच वाचून दाखवितों. तो असा : Mr. Stephen Spender the noted English poet, giving a new definition of the concept of freedom of the artist, said that it was that state of awareness in which the artist had social consciousness and at the same time retained his individualism. Mr. Spender analysed the change in the attitude of the artist towards the society since the 19th century and said that the artist, who was an individualist spitting at the world, had now come to realise that there should again be a marriage between him and society."

## मराठी कादंबऱ्यांचें समीक्षण

तात्पर्य काय कीं कलानिर्मिति ही स्वभावतःच एक समाजसापेक्ष प्रक्रिया आहे. त्यामुळेंच कुसुमावतीबाईंनीं मराठी कादंबरीच्या उत्क्रांतिमार्गाचें विवेचन करतांना मराठी कादंबरी ही समाजाभिमुख असावी अशी अपेक्षा व्यक्त केली आहे; आणि ही अपेक्षा लक्षांत ठेवून त्यांनीं आपलें **'मराठी कादंबरी'** हें पुस्तक लिहिलें आहे. आजच्या आपल्या विवेचनाच्या कक्षेंत त्यांच्या पुस्तकाचा फक्त दुसराच भाग येतो. व्यक्तिवाद आणि सामाजिकता या मराठी कादंबरीच्या निर्मितींत कार्यक्षम ठरलेल्या दोन महत्त्वाच्या प्रवृत्तींवर नजर ठेवून कुसुमावतीबाईंनीं या पुस्तकांत १९२० नंतरच्या मराठी कादंबऱ्यांचें यथान्याय व मार्मिक समीक्षण केलें आहे. हरिभाऊ आपट्यांच्या कादंबऱ्यांत या दोन प्रवृत्तींचा समतोल समन्वय साधलेला आढळून येतो. १९२० नंतरच्या मराठी कादंबरीकारांना मात्र हा समन्वय साधतां आला नाहीं. या समन्वयाला आदर्श करून त्यांनीं फडके, पु. य. देशपांडे, खांडेकर, माडखोलकर इत्यादिकांपासून तों शिरूरकर, बिवलकर, पेंडसे इत्यादि अगदीं अलीकडच्या कादंबरीकारांच्या कृतीचें योग्य परीक्षण केलें आहे. १९२० पासून आजतागायतच्या मराठी कादंबरींतील स्थित्यंतराचें वर्णन त्यांनीं मुख्यतः या दोन प्रवृत्तींच्या आश्रयानेंच केलें आहे. या पुस्तकाच्या अखेरीस आजच्या कादंबरीकारांसंबंधीं ज्या अपेक्षा त्यांनीं व्यक्त केल्या आहेत त्या त्यांच्या कला-दृष्टीवर स्पष्ट प्रकाश टाकणाऱ्या आहेत. माणसाच्या अंतःकरणाविषयीं सहृदय समज व मानवी जीवनाविषयीं व्यापक, सुजाण व सुसंगत दृष्टिकोन हे, त्यांच्या मतें, आजच्या कादंबरीकारांच्या अंगीं अवश्य असले पाहिजेत असे गुण आहेत. **गो. म. कुलकर्णी** यांनीं 'सत्यकथें'तून (आक्टोबर १९५४) या पुस्तकांतील जे दोष, ज्या उणीवा दाखविलेल्या आहेत त्या लक्षांत घेऊनहि असें म्हणावेसें वाटतें कीं कादंबरीवाङ्मयाच्या मूल्यमापनाचा योग्य दृष्टिकोन याच पुस्तकांत सुजाण स्वरूपांत प्रथमच प्रकट झालेला आहे आणि कलात्मकतेच्या दृष्टीनें यशस्वी व प्रभावी असलेली कादंबरी कशी असावी यासंबंधींची निश्चित कल्पना याच पुस्तकांत पहिल्यांदा सोदाहरण साकार झालेली आहे.

आतांपर्यंत मी ज्या चार पुस्तकांसंबंधीं बोललों त्यासंबंधीं विवेचन करीत असतांना कलानिर्मितीनें व्यक्ति व समाज यांच्या कार्यासंबंधींचाच मुख्यतः ऊहापोह करण्यांत आला. यानंतर आपणांपुढें मला फक्त दोन साहित्यशास्त्रीय पुस्तकांचा फक्त निर्देशच करावयाचा आहे. या पुस्तकांचं स्वरूप असं आहे कीं त्यांचा कलानिर्मितीसंबंधींचा आतांपर्यंत चर्चिलेल्या प्रश्नांशीं संबंध नाहीं; म्हणजे असें कीं तो संबंध येणार नाहीं अशाच भूमिकेवरून हीं पुस्तकें लिहिलेलीं आहेत. **ग. त्र्यं. देशपांडे व पु. गो. निजसुरे** यांनीं लिहिलेलें **'अलंकारप्रदीप'** हें त्यांपैकींच एक पुस्तक विद्यार्थ्यांकरितां लिहिलेलें आहे. हें एक शालेय पुस्तक आहे, एवढी याची ओळख पुरे आहे. **'काव्यप्रकाश'** मम्मटाच्या 'काव्यप्रकाशा'चें **पां. कृ. सावळापूरकर** यांनीं केलेलें भाषांतर हें दुसरें पुस्तक. या पुस्तकाची उपयुक्तता स्वयंसिद्ध आहे. मम्मटाचार्यांच्या एकंदर साहित्यशास्त्रीय विचारसरणीचें सर्वांगीण दर्शन घडविणारी विवेचक प्रस्तावना जर या भाषांतराला जोडली असती तर या पुस्तकाची उपयुक्तता निश्चित वाढली असती.

## कांहीं उल्लेखनीय टीकालेख

गेल्या वर्षांत साहित्यशास्त्रांतले अत्यंत जिव्हाळ्याचे







असे जे प्रश्न आहेत त्यांची चर्चा करणारीं जीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं त्यांचा मीं आतांपर्यंत यथामति परामर्श घेतला आहे. याशिवाय गेल्या वर्षांतून निरनिराळ्या नियतकालिकांतून जे अनेक तात्त्विक टीकालेख, परीक्षणलेख व परिचयलेख प्रसिद्ध झाले आहेत त्या सर्वांतील मतमतांतरांची दखल घेणें व त्यांचें यथार्थ मूल्यमापन करणें हें एका स्वतंत्र व्याख्यानाचेंच काम होऊन बसण्यासारखें आहे. अपण अशी अपेक्षा करूं या कीं या वर्षांतल्या महत्त्वाच्या टीकालेखांचे संग्रह पुस्तकरूपानें लवकर बाहेर पडतील आणि पुढल्या वर्षी टीकावाङ्मयाचें समालोचन करणाऱ्याला या टीकालेखांचें सविस्तर व न्याय्य मूल्यमपान करतां येईल. तरीसुद्धां, गेल्या वर्षांतले जे कांहीं टीकालेख विशेषेंकरून उल्लेखनीय वाटतात त्यांचा मी येथें ओझरता उल्लेख करतों. 'सुषमा' मासिकांतून श्री. रा. अ. काळेले यांनीं अकरा लेखांकांतून तांब्यांच्या काव्यांचें अभ्यासपूर्वक पर्यालोचन केलें आहे. काळेल्यांच्या या प्रदीर्घ लेखमालेंत चिकित्सक रसिकतेपेक्षां भक्तिभावप्रेरित गुणग्रहणच जास्त प्रमाणांत प्रकट झालें आहे. 'युगवाणी'तून प्रसिद्ध झालेला कविभूषण प्रा. ब. ग. खापर्डे यांचा गोविंदाग्रजावरील प्रबंध हा आध्यात्मिक अभिरुचीनें लिहिलेला असल्यामुळें मुद्दाम वाचनीय झाला आहे. गोविंदाग्रजांच्या सर्व कवितांत 'प्रेमाचा प्रलयकाळ', 'मुरली' आणि 'कलगी' या तीनच कविता असामान्य व सर्वश्रेष्ठ वाटाव्या, ही गोष्ट खापर्ड्यांच्या अध्यात्मप्रवण अभिरुचीची निदर्शक आहे. संस्कृत आणि बंगाली वाङ्मयाचा सरस परिचय करून देणारे कांहीं लेख प्रसिद्ध झाले आहेत. उदाहरणार्थ, डॉ. वाटवे यांनीं 'अमृत' मधून उत्तररामचरिताचें रसग्रहण केलें आहे. प्रा. अरविंद मंगळूरकर यांनीं ''अंजलि'मधून कालिदासाच्या उमा व सीता या दोन स्त्रीरत्नांच्या व्यक्तिरेखांचा साधार व सरस परिचय करून दिलेला आहे. बंगाली वाङ्मयांतील शरद्‌बाबूवर प्रा. श्री. के. क्षीरसागर ('हंस' दिवाळी अंक) व नरहर कुरुंदकर ('मराठवाडा' दिवाळी अंक) यांचे लेख प्रसिद्ध झाले आहेत. क्षीरसागरांनीं 'शेषप्रश्न' मधील कमलच्या जीवनांतील बंडखोरीचें दर्शन अत्यंत तन्मयतेनें व आवशेपूर्ण पद्धतीनें घडविलें आहे.

कांहीं परीक्षण-लेखांतून जुन्या मराठींतील कवींचा व त्यांच्या वाङ्मयाचा परामर्श घेण्यांत आला आहे. कवि मुक्तेश्वरावरील प्रा. न. र. फाटक यांचा लेख, 'संतांची अभंगवाणी' हा डॉ. तुळपुळे यांचा लेख, वामन पंडितांवरील डॉ. म. करंदीकर यांचा लेख ज्ञानेश्वरींतील काव्यावरचा डॉ. वाटवे यांचा लेख (हे सर्व लेख 'लोकमान्य' दिवाळी अंकांतले) – हे सर्व लेख अधिकारी व्यक्तींनीं लिहिले असल्यामुळें महत्त्वपूर्ण ठरण्यासारखे आहेत. जुन्या मराठींतील शाहिरी वाङ्मय हेंहि आजच्या कांहीं मराठी वाङ्मयविवेचकांच्या प्रीतीचें स्थान होऊन बसलें आहे. अशा विवेचकांत श्री. म. ना. सहस्रबुद्धे या शाहिरी वाङ्मयाच्या साक्षेपी अभ्यासकाचें नांव सर्वविश्रुतच आहे. त्यांनीं 'विविधवृत्त'च्या दिवाळी अंकांतून शाहीर होनाजी शिलारखाने यांच्यावर लिहिलेल्या लेखांतून होनाजीच्या शृंगारिक कवनांचा आध्यात्मिक अर्थ कसा लावावा याचें त्यांनीं साधार विवेचन केलें आहे. सहस्रबुद्ध्यांच्याच शब्दांत सांगायचें म्हणजे या लेखरूपानें शाहीर होनाजीच्या द्व्यर्थी लावण्यांचें कुलुप उघडण्याची किल्ली त्यांनीं वाचकांच्या हातीं दिली आहे आणि त्या लावण्यांत खरा रस शृंगार नसून अध्यात्माचा आहे असें त्यांचें आग्रहाचें सांगणें आहे.

आधुनिक मराठी कवींवर लिहिलेल्या लेखांत डॉ. रा. शं. वाळिंबे यांचा 'केशवसुतांचा व्यक्तिवाद आणि वास्तवाधिष्ठित ध्येयवाद' हा लेख केशवसुताच्या अभ्यासकांच्या विचारांना चालना देणारा आहे. आत्यंतिक गौरवानें लिहिलेल्या या लेखांत केशवसुतांच्या नैराश्याचें जें एक प्रकारें उदात्तीकरण करण्यांत आलें आहे तें विवाद्य वाटण्यासारखें आहे. आधुनिक मराठींतील कांहीं वाङ्मयप्रकारांतील जुन्या नव्या प्रवृत्तींचा परामर्श घेणारे एकदोन लेख प्रसिद्ध झाले आहेत. आजच्या वाचकांचा सर्वांत जास्त आवडता वाङ्मयप्रकार म्हणजे लघुकथा. स. ग. मालशे यांनीं मराठी लघुकथेच्या अंतर्बाह्य स्वरूपांत झालेल्या प्रमुख परिवर्तनांचा परिचय करून दिलेला आहे तर वा. ल. कुलकर्णी यांनीं मुख्यतः मराठी लघुकथेंतील नव्या प्रवृत्तींची आत्मीयतापूर्वक ओळख करून दिलेली आहे. शेवटीं उल्लेख करावयाचा आहे तो 'पुरुषार्थ' मासिकाच्या खास कोल्हटकर अंकाचा. या अंकांत पूर्णता येण्याच्या दृष्टीनें त्यांत कोल्हटकरांच्या कादंब-

त्यांवरहि एक विवेचक लेख येणें आवश्यक होतें. या अंकांतील एका लेखानें माझें जें कुतूहल जागृत केलें तें अजून तसेंच कायम आहे. '**रविकिरण-मंडळाचे अरुणः कोल्हटकर**' हा तो लेख. हा **प्रा. पु. शि.** रेगे यांनीं लिहिलेला आहे. रेग्यांना वाङ्मयीन संशोधनाचा नवा छंद जडला आहे असं या लेखावरून अनुमान काढणें शक्य आहे. हा लेख वाचून माझी पहिली प्रतिक्रिया झाली ती अशी कीं सध्यां मराठी वाङ्मयांत नवकथा, नवकाव्य, नवनाट्य, नवसमीक्षा अशीं नवनवीं दालनें उघडलीं आहेत. हा लेख लिहून रेग्यांनीं नवसंशोधनाच्या नव्या दालनाचें उद्घाटन केलें आहे. त्यांच्या संशोधनाचें सार हें आहे कीं, "१९२० ते १९३५ या काळांतील ' रविकिरण-मंडळाचें काव्य जर पाहिलें किंवा त्याच काळांतील मायदेवा-सारख्या कवीचें काव्य जर लक्षांत घेतलें तर कोल्हट-करांनीं या कवितेला जन्म दिला असें म्हणावयास हरकत नाहीं. ' छत्रीचे उपकार ' या कवितेंतील उथळ विनोद व क्लिष्ट संस्कृतप्रचुर रचना सोडली तर या चार कडव्यांच्या कवितेंत आपणांला संपूर्ण यशवंताच्या कवितेचें बीज सापडतें. ' खरी भाऊबीज ', ' सुखकर जागृति ' यांसारख्या कवितांत ठायींठायीं गिरीश भेटतात. ' एका स्त्रीची पर्जन्यविषयक कल्पना ' या कवितेंत समग्र मायदेव उभे राहतात. " रेग्यांच्या या संशोधनामागील हेतु लक्षांत घेऊन त्यांचा जागृत टीकाकारांनीं यथोचित परामर्श शक्य तितक्या लवकर घेणें अत्यंत आवश्यक आहे.

## दोन परीक्षणांतील आत्यंतिक टोकें

गेल्या वर्षातील टीकावाङ्मयाचें हें कांहींसें धावतें समालोचन केल्यानंतर, त्या वाङ्मयासंबंधींचा एक विशेष अभिनंदनीय आणि गौरवार्ह पैलू आपल्या नजरेंत भरतो. तो हा कीं आजच्या मराठींतले वाङ्मयविवेचक वाङ्मयसमीक्षेच्या मूलतत्त्वांची अत्यंत आस्थापूर्वक आणि अभ्यासपूर्वक चर्चा करूं लागले आहेत. प्रत्यक्ष परीक्षणलेखांत मात्र ही आस्था, हा व्यासंग पुरेशा प्रमाणांत साकार झालेला दिसत नाहीं. अजूनहि कधीं कधीं आत्यंतिक स्तुति किंवा आत्यंतिक निन्दा असा आमच्या परीक्षणलेखांचा प्रकार आढळून येतो. याचं एकच उदाहरण सांगतों. आत्यंतिक गौरवाचा नमुना म्हणून श्री. दे. ना. टिळक यांनीं '**सह्याद्री**'मधून **प्रा. भ. श्री. पंडिताच्या 'आधुनिक मराठी कविते'वर जो परीक्षणलेख** लिहिला आहे तो वाचण्यासारखा आहे. याच पुस्तकावर **श्री. ' तटस्थ '** यांनीं '**सुषमें**'तून जें परीक्षणात्मक स्फुट लिहिलें आहे आणि तेवढ्या स्फुटाइतकीच त्या पुस्तकाची योग्यता आहे असं ज्यांतून ध्वनित केलं आहे त्यांत टीकेचं दुसरं टोक गाठलं आहे. ' तटस्थां'च्या मतें, पदोपदीं दिसून येणाऱ्या ' गंमती ' हा पंडितांच्या ग्रंथाचा मुख्य विशेष आहे. त्या गंमतीचा नमुना म्हणून त्यांनीं पंडितां-च्या पुस्तकांतलीं कांहीं वाक्यें उद्धृत केलीं आहेत. त्यांतलें एक वाक्य असें : " प्रेक्षक सुबुद्ध असले तरच नाट्यकाव्याचें चीज होतें. कथाकाव्याचे वाचक निर्बुद्ध असले तरी चालतें. " मला वाटतें, पंडितांच्या पुस्तका-बाबत श्री. टिळक व तटस्थ यांनीं दाखविलेली आत्यंतिकता ही वाचकांची दिशाभूल करणारी आहे. टीकाकार हा समाजाचा एक जबाबदार घटक आहे ही आपली भूमिका आहे. वाचकांची दिशाभूल करणाऱ्या अशा टीकालेखनपद्धतींत त्यानें सहभागी होणें हें अक्षम्य आहे.

आतांपर्यंत आपण जें टीकावाङ्मयाचें समालोचन केलें त्यावरून टीकाकाराची भूमिका आणि कार्यपद्धति निश्चित मांडतां येण्यासारखी आहे. कोणत्याहि वाङ्म-यीन कृतीचें व ती निर्माण करणाऱ्या व्यक्तीचें मूल्यमापन करतांना तीन प्रश्न मुख्यतः विचारले पाहिजेत : १ विशिष्ट वाङ्मयीन कृतींतून निर्मात्याचें जें व्यक्तित्व प्रकट झालें आहे त्याचा दर्जा कोणता आहे ? २. त्या वाङ्मयीन कृतींत प्रकट झालेल्या आशयावरील निर्मात्याची निष्ठा कितपत उत्कट व प्रबळ आहे ? आणि ३. तो आशय ज्या चित्राकृतीच्या साहाय्यानें साकार झालेला आहे त्याच्या चित्रणांत अंतर्गत संवाद कितपत साधलेला आहे ? – या तिन्ही प्रश्नांचीं समाधानकारक उत्तरें देण्याकरितां साहित्यशास्त्र, मानसशास्त्र व समाजशास्त्र या तिन्ही शास्त्रांचें साहाय्य घ्यावें लागेल. वाङ्मयाच्या निर्मितीला मुख्यतः व्यक्तिगत प्रतिभा कारणीभूत होत असली तरी ती प्रतिभा बव्हंशीं अनेक सामाजिक संस्कारांनीं प्रभावित झालेली असल्या-मुळें वाङ्मयाची स्वभावसिद्ध अशी सामाजिकता नेहमीं लक्षांत ठेवली पाहिजे. आणि वाङ्मयाचा लोकांच्या मनावर व पर्यायानें जीवनावर निश्चित परिणाम होतो










हें ध्यानांत ठेवून, समाजविकासाला मारक अशा अनिष्ट प्रवृत्ती वाङ्मयांत बळ धरीत नाहींत व प्रतिष्ठा पावत नाहींत याबद्दल सर्वसामान्य वाचकांनीं, विशेषतः टीकाकारांनीं सदैव जागृत राहिलें पाहिजे. समाजाच्या विकासक्रमाला सुजाणपणें हातभार लावणें हें कलावंतांचें आवश्यक कर्तव्य आहे; लादलेलें नव्हे; तर खऱ्या कलानिर्मितीच्या प्रक्रियेंत स्वभावतःच अंगभूत असलेलें असें तें कर्तव्य आहे. अर्थात् कलावंतांनीं आपली ही अंगभूत सामाजिक जबाबदारी ओळखली नाहीं तर समाजाची प्रगति त्याच्याकरितां रोखली जाणार नाहीं. जीवनाला विन्मुख होऊन मानवसमाज, आपलं वेगळं घरकुल थाटूं पाहणाऱ्या कलावंताला असं स्पष्टपणें सांगेल कीं "याल तर तुमच्यासह, न याल तर तुमच्याशिवाय, मी सर्वांगीण विकासाच्या दिशेनें प्रवास करणार आहे." तेव्हां वाङ्मय ही एक सामाजिक शक्ति आहे हें लक्षांत घेऊन, आपल्या समाजांत असामाजिक व म्हणून चुकीचीं असलेलीं मूल्यें रूढ होऊं पाहात असतील तर टीकाकारांनीं तीं हाणून पाडलीं पाहिजेत, अनिष्ट व समाजद्रोही स्वरूपाच्या वाङ्मयीन प्रवृत्ती रसिकांना मोह घालून त्यांची अभिरुचि भ्रष्ट करीत असतील तर त्यांचा टीकाकारांनीं प्रखर शब्दांत निषेध केला पाहिजे व समाजाला वेळोवेळीं वाङ्मयीन अभिरुचीच्या बाबतींत योग्य मार्गदर्शन केलें पाहिजे. मीं पूर्वी माझ्या भाषणांत कार्ल मॅनहाइमच्या 'Man and Society in an Age of Reconstruction' या पुस्तकाचा उल्लेख केलेला आहे. त्या पुस्तकांतील एक उतारा येथें उद्धृत करून मी माझें भाषण संपविणार आहे. तो म्हणतोः

"Even in a mass democracy, cultural sublimation, as for example, in art and in fashion, can take place only if small groups of connoisseurs who create and mould taste, already exist and slowly diffuse the content and the technique of sublimation over the rest of society. In al l the spheres of cultural life, the function of such elites is to express cultural and psycholgical forces in primary forms and to guide collective extraversion and introversion they are responsible for cultural initiative and tradition" तेव्हां या उताऱ्यावरून आपण निष्कर्ष काढावयाचा तो हा कीं कलेला सांस्कृतिक मूल्य नाहीं असं म्हणणारी जी कलादुष्ट आणि समाजदुष्ट अशी विचारधारा आज शिष्टमान्य होऊं पाहात आहे तिची अयथार्थता, भ्रामकता व विनाशकारिता सर्वसामान्य वाचकांना व साहित्यिकांना टीकाकारांनीं दिली पाहिजे आणि आपली एक छोटीशी संघटना उभारून, उच्च कलात्मकतेशीं सुसंवाद राखणारे योग्य वाङ्मयीन आदर्श वाचकांपुढें व साहित्यिकांपुढें सदैव राहतील व त्यांना मान्य होतील या दिशेनें जाणीवपूर्वक प्रयत्न व्हावयास पाहिजेत. अशा प्रयत्नांना चांगलें बहारदार आणि परिणामकारक स्वरूप आलेलें तुम्हा-आम्हांस लवकरच पाहावयास मिळेल अशी अपेक्षा व्यक्त करून मी हें माझें समालोचन संपवितों.

---

## हळूंच कांहींसें— !

हळूंच कांहींसें
    कानांत बोलला
    चावट वारा

त्यानेंच मनांत
    थरंगळला
    चंचळ पारा

क्षणांत गेल्या
    शिंपून धरणी
    जीवन धारा

आणिक स्वरांस
    तांबुस फुटला
    कोंवळा धुमारा !

— राजा मंगळवेढेकर

डॉ. इरावती कर्वे

# कॉलेजांतील शिक्षण व परीक्षा-पद्धति

## जुन्या समाजव्यवस्थेंतील शिक्षण व परीक्षा

परीक्षा-पद्धति ही सर्वस्वीं नसली तरी बरीचशी अभ्यासक्रम व शिक्षणपद्धतीवर अवलंबून असते. कांहीं एका कालखंडांत मुलाला शिकवायचें व नंतर तो काय शिकला ह्याची चांचणी करायची अशी आपल्या इकडील सध्यांची पद्धत आहे. विद्यार्थी शिकत असतांनाच सारखी त्याची चांचणी करावयाची व पहिलें शिकवलेलें तो जसजसें आत्मसात् करील तसतसें पुढें शिकवीत जायचें अशी दुसरी पद्धत आहे. जुन्या काळीं आपल्याकडे जें शिक्षण गुरुगृहीं दिलें जाई तें ह्या दुसऱ्या प्रकारचें असे. एका गुरूकडे मोजकीं मुलें असत. तीं गुरुजीकडे जेवीत, निजत व गुरुजींच्या घरचें पडेल तें काम करीत. अशा मुलांना शिकवायचें म्हणजे ग्रंथ बहुतेक नसतच. एखादी पोथी असलीच तर ती फक्त गुरुजींजवळ असे व गुरुजी मुलांना तोंडीं शिकवीत व त्यांच्याकडून पाठ करून घेत. शिकवलेलें पाठ झालें कीं पुढें शिकवीत. ज्यांचे होत नसे तीं मागें रहात. एकाच गुरुजींकडे शिक्षणाच्या निरनिराळ्या पायरीवर असलेले विद्यार्थी असत. कदाचित् पुढें गेलेले विद्यार्थी नवशिक्यांचे किंवा मागें राहिलेल्यांचे अभ्यास करून घेत असतील. अशा पद्धतींत शिकवणें व परीक्षा ह्या क्रिया जोडीनें चाललेल्या असत. पुढें पाठ व मागें सपाट होऊं नये म्हणून मागच्याची परत परत उजळणी होई व सर्व अभ्यास झाला म्हणजे शिकवलेले सर्व विषय उत्तम विद्यार्थ्याला तोंडपाठ असत व इतरांना फारच थोडे तोंडपाठ असे.

ह्या शिक्षणपद्धतीच्या गुणदोषांचें सविस्तर वर्णन करण्याचें आपल्यास कारण नाहीं. पण ही पद्धत शक्य होण्यासाठीं मोजका अभ्यास, मोजके विद्यार्थी व शिकवण्याला व शिकण्याला भरपूर वेळ अशा तीन गोष्टी आवश्यक होत्या. वयाच्या आठव्या वर्षी अभ्यास सुरूं करून बारा वर्षें कमींत कमी व चोवीस ते छत्तीस वर्षें जास्तींत जास्त त्यांत घालवण्याची तयारी पूर्वी असे.

हें शिक्षण जरी तोंडीं असे तरी त्याला पुस्तकी म्हणण्यास हरकत नाहीं. इतिहास ( पुराणरूपानें ), व्याकरण, न्याय, मीमांसा, तत्त्वज्ञान ह्या स्वरूपाचें हें शिक्षण असे. भारतीयांच्या वैचारिक संस्कृतीबद्दल तें होतें. प्रत्यक्ष जीवनोपयोगी कला जो तो आपापल्या कुंटुंबांतील किंवा जमातींतील वृद्धांकडून शिकत असे. त्यासाठीं इतकीं वर्षें खर्च करावीं लागत नसत. पण तेथेंहि कसबाच्या परीक्षा त्या त्या कारागीरसंघांकडून घेतल्या जात.

पूर्वी जातीवर आधारलेली समाजव्यवस्था असे. कांहीं विशिष्ट जातींनाच सांस्कृतिक शिक्षण घेण्याचा अधिकार असे. त्या जातींतहि बहुसंख्य लोक थोडेसे ' म्हणणें ' व गृहस्थाश्रमाचीं नित्य व नैमित्तिक कार्यें पार पाडण्याइतपत शिकत व अगदीं थोडे गुरुगृहीं राहून कष्टानें विद्या साध्य करीत. समाजांतील बहुसंख्य लोकांना सांस्कृतिक शिक्षण तर नव्हतेंच पण अक्षरांचीसुद्धा ओळख नव्हती.

ह्या जुन्या समाजव्यवस्थेंतून निघून मानवी समतेच्या तत्त्वावर आधारलेल्या एका नव्या समाजरचनेकडे आपण जात आहों. कोणीहि मनुष्य पोटासाठीं कसलाहि उद्योग करीत असला तरी त्याला लेखन, वाचन व थोडें सांस्कृतिक शिक्षण मिळालें पाहिजे असा हल्लीं कटाक्ष आहे व त्यामुळें शिक्षण घेण्याला योग्य अशा सर्व मुलांना प्राथमिक शिक्षण तर मिळालें पाहिजेच पण दुय्यम शिक्षण व उच्चशिक्षणहि शक्य तितक्या जास्त लोकांनीं घ्यावें अशी व्यवस्था करण्यास आपण झटत आहोंत. पूर्वी कधींहि नाहीं इतक्या संख्येनें आज शिक्षणाच्या सर्व शाखांतून विद्यार्थी शिक्षण घेत आहेत व ती संख्या दिवसेंदिवस वाढतच जाणार. ह्या विद्यार्थ्यांना योग्य तऱ्हेनें शिकवणें कसें शक्य होईल हा आपल्यापुढील प्रश्न आहे.

## शाळकरी विद्यार्थी व कॉलेजांतील विद्यार्थी

शाळांतील अभ्यासक्रम व शिकवण्याची पद्धत












अनुक्रमणिका

ह्याचा सांगोपांग विचार जरी केला नाहीं तरी एका गोष्टीकडे लक्ष वेधणें जरूर आहे. शाळांतील अभ्यास मोजका असतो. पुस्तकें नेमलेलीं असतात व प्रत्येक धडा शिक्षक वर्गांत करून घेतो, त्याचे प्रश्न विचारतो, त्यावर घरीं अभ्यास देतो व मुलांनीं लिहून आणलेला अभ्यास तपासतो. त्याशिवाय प्रत्येक शाळेंत आठवड्याच्या, महिन्याच्या, सहामाहीच्या व सरतेशेवटीं वार्षिक अशा परीक्षा असतात. म्हणजे मुलांना शिकवणें, त्यांच्याकडून अभ्यास करून घेणें व चांचणी ह्या क्रिया सारख्या चाललेल्या असतात.

शालान्त परीक्षेनन्तर दिसायला विषय जरी मोजके असले तरी ते विस्तारपूर्वक शिकावे लागतात. एकेका तासांत शिक्षक दहा-पानें—पंधरा-पानें ते एम. ए. ला दोनशें पानांचा ऐवज शिकवीत असतो. शाळेंत विद्यार्थ्यांचा अभ्यास वर्गांत व घरीं दिलेल्या अभ्यासानें करून घेतां येतो. कॉलेजांत जसजसें पुढें जावें तसतसें मुलांनीं स्वतः करावयाच्या अभ्यासाची जबाबदारी वाढते. शिक्षक विषय समजावून देतो पण अभ्यास करून घेत नाहीं. सायन्सच्या बाजूला धड्याबरोबर प्रयोग चालल्यामुळें शिकलेल्याची उजळणी होत असते पण वाङ्मयेतिहास-शास्त्रांच्या बाजूला तें होत नाहीं. विद्यार्थ्यांचें वय वाढत असतें व त्यानें आपली जबाबदारी ओळखून न चुकतां वर्गास हजर रहाणें, लक्ष लावून शिक्षकाचें व्याख्यान ऐकून, ऐकतां ऐकतां टांचण करणें व घरीं आल्यावर पुस्तक पाहून टांचण पूर्ण करणें एवढें केलें तरी देखील कोणीहि नापास होईल असें वाटत नाहीं.

शाळकरी मुलांप्रमाणें प्रत्यक्ष धडे करून न घेण्यामुळें प्रत्यक्ष धडे देण्याचा वेळ कॉलेजांत थोडा असतो. बराच वेळ विद्यार्थ्यांना रोज मोकळा असतो व ग्रंथालयांत किंवा घरीं त्यांनीं ह्या वेळांत अभ्यास करावा अशी अपेक्षा असते. हें फारच थोडे विद्यार्थी करतात. कांहीं विद्यार्थ्यांना पुस्तकें विकत घेण्यास पैसे नाहींत असें ते म्हणतात. पण पुस्तकाची अडचण परीक्षा जवळ आली कीं त्यांना कळते. पहिल्या दिवसापासून अभ्यास करावयाचा ठरवल्यास ग्रंथालयांत जाऊन पुस्तक पहातां येईल, आपल्या सहकाऱ्यांकडून जरा वेळ मागून घेतां येईल. पण खरा प्रकार असा असतो कीं पुस्तकाच्या उणीवेची जाणीव फार उशीरां होते.

## सुट्ट्या आणि अभ्यासेतर कार्यक्रम !

कॉलेजांतील अभ्यासक्रमांत एक मोठा अडथळा म्हणजे सुट्ट्यांचा असतो. विलायतेंत रविवार ही सार्वत्रिक सुट्टी असते ती फक्त मिळते. एरवीं अभ्यासाच्या कालखंडांत (टर्ममध्यें) जवळजवळ सुटी नाहींच म्हटलें तरी चालेल. त्यामुळें एका टर्ममध्यें किती व्याख्यानें द्यावीं व विषय कधीं संपवावा त्याचा नीट अंदाज शिक्षकाला बांधता येतो. आपल्याकडे रविवारची विलायती सुटी सार्वत्रिक झालीच आहे, पण त्याशिवाय नित्यनैमित्तिक सुट्या इतक्या असतात कीं अभ्यासाला पुरेसा वेळ मिळत नाहीं. जसजसा अभ्यास वरच्या वर्गाचा, तसतसा सुट्ट्यांमुळें अभ्यास जास्त बुडतो. रविवारची सुटी घेतली तर सणावाराच्या सुट्या काढून टाकल्या पाहिजेत. ह्या नित्य सुट्या कधीं आहेत त्याचा निदान अंदाज तरी असतो पण नैमित्तिक सुट्ट्यांना तर ताळच नाहीं! नैमित्तिक सुट्ट्यांत गॅदरिंग (कॉलेजचें, बी. ए. च्या मुलांचें, एम्. ए. च्या मुलांचें अशीं निरनिराळीं), मॅचचा शेवटचा दिवस, पदवीदान समारंभाचा व नंतरचा दिवस, आंतर्विद्यालय सामन्यांचे दिवस, बक्षिससमारंभाचा दिवस, खेळांत अजिंक्यपद मिळेल त्या कॉलेजला आणखी एक दिवस व — कोणीं मेलें तर — अशा अनेक सुट्या केव्हां येतील ह्याचा नेमच नसतो. एम्. ए. ला सर्व व्याख्यानें सकाळीं असतात. आठवड्यांतून दर विद्यार्थ्याला बहुतेक फक्त चारच व्याख्यानें असतात. कांहीं प्रोफेसर चार दिवस फुकट जाणें नको (— गणेशखिंडीला जाण्यायेण्यांत फार वेळ खर्च होतो—) म्हणून दोन दोन तास लागोपाठ घेतात. अशा वेळीं सुट्टीमध्यें फार अभ्यास बुडतो. खरोखर एम्. ए. ला एकहि सुट्टी देण्याचें कारण नाहीं. कॉलेज २० जूनला सुरू होऊन सुमारें १५ आक्टोबरपर्यंत चालतें व परत १० नोव्हेंबर पासून १५ मार्चपर्यंत दुसरी सहामाही असते. ह्या हिशेबानें पहिल्या टर्मचे एकूण दिवस ११७ व नाताळची १४ दिवसाची सुट्टी काढून टाकली म्हणजे दुसऱ्या टर्मचे १११ दिवस,— असे शैक्षणिक वर्षांत एकंदर २२८ दिवस असतात. ह्यांतील सुमारें ३२ रविवार व २० ते २२ पुणें विद्यापीठाच्या सुट्या (विद्यापीठस्थापना दिन, शिवजयंती, टिळकजयंती आणि नेहमींचे धार्मिक सण, तसेंच आंतरमहाविद्यालयीन







सामन्यांकरतां ३ दिवस इत्यादि ) आणि प्रत्येक महाविद्यालयाच्या विशिष्ट सुट्या ( नियामक मंडळांतील अगर शिक्षकांपैकीं कोणी मृत झाल्यास, तसेंच प्रत्येक महाविद्यालयाचें संमेलन, स्थापनादिन इत्यादि ) सुमारें ५ ते ६ असे एकूण सुमारें ६० दिवस वगळले म्हणजे १६८ दिवस केवळ शिक्षणाकरतां उरतात. त्यांतलेहि दर टर्ममध्यें ७-८ दिवस परीक्षेकरतां द्यावे लागतात म्हणजे दोन्ही टर्ममध्यें १२-१५ दिवस काढले म्हणजे सुमारें १५० दिवस अभ्यासाकरतां उरतात. बी. ए. किंवा बी. एस्‌सी. ह्यांची फी वर्षास २५० ते ३०० रुपये असते हें लक्षांत घेतलें म्हणजे एक दिवस फुकट घालवणें म्हणजे पालकांचे किती पैसे फुकट घालवण्यासारखें आहे हें सहज समजेल. आणि तरीहि विद्यार्थी अगदीं क्षुल्लक कारणाकरतांहि काडीमात्र विचार न करतां सुट्टी मागण्यास तयार असतात! बरें, वर्षांत जो अभ्यास करावयाचा असतो तो कायमच असतो. तेव्हां सुट्टीमुळें अभ्यास बुडला म्हणजे एक तर नेमलेला सर्व भाग वर्गांत होऊं शकत नाहीं, किंवा सुट्टीच्या दिवशीं जादा तास घेऊन सर्व भाग करावा लागतो. म्हणजे कसेंहि पाहिलें तरी सुट्टीमुळें विद्यार्थ्यांचा कोणच्याच प्रकारचा फायदा होत नाहीं. केवळ तात्कालिक ' सुटका ' ह्यापलीकडे त्याला किंमत नाहीं. पण हा विचार कोणी करीत नाहीं.

सुट्यांखेरीज किंवा सुट्यांच्याच जोडीला अभ्यासाखेरीज इतर कार्यक्रमांमध्येंहि विद्यार्थ्यांचा बराच वेळ जातो. खेळ, नाटकें बसवणें, वादविवादसभा, एन्. सी. सी. वगैरे कार्यक्रम चालू असतात. प्रत्यक्ष व्याख्यानांखेरीज विद्यार्थ्यांना कॉलेजांत मोकळा वेळ पुष्कळच असतो व अभ्यास करूनहि ह्या कार्यक्रमांना भरपूर वेळ मिळणें शक्य असतें. पण ह्या कार्यांवर कित्येकदां एवढा भर दिला जातो कीं अभ्यासाकडे मुलांचें लक्ष लागत नाहीं. इंग्लडांत खेळांना महत्त्व बरेंच आहे. शाळांतून व कॉलेजांतून सामने चालू असतात. युरोपांतील इतर देश इंग्लंडच्या मानानें गरीब असल्यामुळें तेथें खेळांचें बंड नाहीं. युनिव्हर्सिटीतर्फे कोण खेळाडू आहेत हे बहुसंख्य विद्यार्थ्यांना माहीतहि नसतें. खेळणारे खेळत असले तरी त्याची दखल युनिव्हर्सिटी कधींहि घेत नाहीं. युनिव्हर्सिटीचा मुख्य व एकमेव कार्यक्रम शिक्षण अशी भूमिका असते. इंग्रजांच्या राज्यामुळें आपणहि खेळांना अभ्यासक्रमांत घुसडून दिलें आहे. इंग्रजांचे खेळ थोडेच आहेत व त्यामुळें असल्या सामन्यांत त्यांचा फार वेळ जात नाहीं. शिवाय इंग्लंडमधील सर्व शाळा व कॉलेजें ह्यांचे सामने चालत नाहींत. पण आपण मात्र क्रिकेट, टेनिस, बॅडमिंटन, पिंगपांग ह्यांशिवाय हुतूतू, खोखो आट्यापाट्या, कुस्ती व इतर वैयक्तिक खेळ ह्या सर्वांचेच सामने करतों व ते एका विद्यापीठाच्या सर्व कॉलेजांचे; ह्यामुळें विद्यार्थ्यांचा वेळ व कॉलेज व विद्यार्थी ह्यांचा पैसा फार खर्च होतो.

विद्यार्थ्यांनीं शाळेंत अगर कॉलेजांत असतांना खेळ, वक्तृत्वाच्या चढाओढी, बॉय-स्काउट, नॅशनल कॅडेट कोअर इत्यादि प्रकारच्या निरनिराळ्या अभ्यासेतर चळवळींत किती वेळ घालवावा हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. त्यांतूनहि पहिल्या टर्ममध्यें कांहीं ठिकाणीं पावसाळा व कांहीं ठिकाणीं उन्हाळा असल्यामुळें खेळांचे सामने बहुतेक दुसऱ्या टर्ममध्येंच होतात. जर्मनी, फ्रान्स वगैरे देशांत निदान विद्यापीठांत तरी हें खेळांचें बंड नाहीं. शनिवार-रविवारीं विद्यार्थी पायपिटीला, होडींतून सहल करण्यास किंवा कांहीं खेळ खेळण्यास जातात. पण अभ्यासाच्या दिवसांत विद्यार्थी सामने खेळण्यास गेले आहेत ही गोष्ट तेथें प्रत्येकाला चमत्कारिक वाटेल. जर्मन विद्यापीठांतील प्रत्येक प्राध्यापक-मुख्यापासून दुय्यमापर्यंत-आपलें संशोधन, अध्यापन, लेखन, वाचन ह्यांत गुंतलेला असतो. अर्थात् तोहि रविवारीं अगर उन्हाळ्या-हिवाळ्याच्या सुट्यांत पायीं प्रवास, पोहणें, खेळणें, बर्फाचे खेळ खेळणें ह्या गोष्टी करतो. पण एकदां टर्म सुरू झाली कीं मग ह्या सर्व गोष्टी बंद. विद्यार्थ्यांच्या अभ्यासेतर जीवनाशीं अध्यापकांचा फारच थोडा संबंध येतो. एकंदरींतच इंग्लंडच्या वरवर पाहून केलेल्या नकलीमुळें आपण विद्यापीठांत खेळांना वाजवीपेक्षां जास्त महत्त्व दिलें आहे आणि खेळ किंवा व्यायाम हीं साधनें आहेत, शरीरस्वास्थ्य, तरतरी, उत्साह यांचीं साधनें आहेत, साध्यें नव्हेत हें विसरलों आहों. विद्यापीठांतील जीवनाचें मुख्य साध्य ज्ञान मिळवणें, शील बनवणें हें आहे व त्याकरतां सपाटून अभ्यास करणें जरूर आहे हें सर्वांनीं ओळखलें पाहिजे. परिस्थिति मात्र अशी आहे कीं जर एका कोणत्या गोष्टीचा विद्या-








र्थ्यांना कंटाळा असेल तर तो अभ्यासाचा. अभ्यास करावा लागूं नये म्हणून हरप्रयत्न चालू असतात. अभ्यासाला एकसारखा प्रतिकार होत असतो. वाटेल तितक्या नोटिसा लावल्या तरी सर्व विद्यार्थी 'ट्युटो-रियल' लिहून आणून देत नाहींत. शंभर विद्यार्थ्यांच्या वर्गांत ८ दिवस मुदत देऊन घरून कांहीं अभ्यास लिहून आणावयास सांगितला तर कधींहि सर्व शंभर मुलें तो आणणार नाहींत! जीं आणतील त्यापैकीं समाधानकारक कितींचा असेल हा प्रश्न वेगळाच!

## शिक्षण कुचकामाचें ही वृथा ओरड!

ह्या झाल्या विद्यापीठांतील अडचणी. ह्याशिवाय मोठी अडचण म्हणजे अभ्यास करावयास जी सामाजिक परिस्थिति लागते ती नाहीं. आपल्या बहुसंख्य देश-बांधवांना शिक्षण घ्यावयाची जी संधि मिळत नाहीं ती आपल्याला मिळाली आहे, आपण त्याचा शक्य तितका जास्त उपयोग करून घेतला पाहिजे अशी भावना असेल तर विद्यार्थी अभ्यास करतीलच करतील. पण विद्यार्थ्यांना तसें वाटावें असें वातावरण समाजांत नाहीं. सर्वच लोकांनीं हल्लींचें शिक्षण कुचकामाचें म्हणून ओरड केली तर शिक्षणाबद्दल प्रेम व आदर नष्ट होतात व शिकवणारा बोलला किंवा त्यानें शिक्षा केली तर तें योग्यच आहे असें वाटेनासें होतें.

हल्लींचें शिक्षण कुचकामाचें आहे अशी ओरड सायन्स, एंजिनिअरिंग, वैद्यक, शेती वगैरे शिक्षणाबद्दल नसते. ती बी. ए. व एम्. ए. बद्दल असते. सध्याच्या शिक्षणक्रमाबद्दल विस्तारानें लिहिण्याचें हें स्थान नव्हे. पण तें शिक्षण व त्याचें कार्य हें थोडक्यांत काय आहे तें पहाणें परीक्षांबद्दल बोलतांना अस्थानीं होणार नाहीं. कॉलेजच्या पहिल्या वर्षापासून एम्. ए.पर्यंत प्रत्येक विद्यार्थी जगाचा सांस्कृतिक इतिहास, जगाचा भूगोल, नागरिकत्व म्हणजे काय?, हिंदुस्थानचें राज्यतंत्र, कांहीं उत्तम इंग्रजी वाङ्मय, तर्कशास्त्र किंवा गणित, मातृ-भाषा हे विषय शिकतो व तत्त्वज्ञान, मानसशास्त्र, राजनीति, अर्थशास्त्र, समाजशास्त्र, संस्कृत, पाली, अर्धमागधी, जर्मन, फ्रेंच, इंग्रजी, मराठी वगैरे भाषा इत्यादि विषयांपैकीं एक किंवा दोन ऐच्छिक विषय म्हणून शिकतो. ह्यांत कुचकामाचें असें काय आहे हेंच कळत नाहीं. एखाद्या खंडप्राय देशांत लक्षावधि कारकून, अधिकारी वर्ग, शिक्षक हे लागणार आणि ते बहुसंख्य बी. ए. किंवा एम्. ए झालेल्यांमधूनच येतात. ज्यांच्या हातांत लहानापासून मोठीं कामें असतात अशा लोकानां वरील तऱ्हेचें शिक्षण मिळालें तर तें देशाच्या दृष्टीनें निरुपयोगी आहे असें वाटत नाहीं. ह्या शिक्ष-णांत इतिहास शिकतांना प्राचीन व अर्वाचीन भारतावर जास्त वेळ खर्चावा, सांस्कृतिक इतिहास केवळ पाश्चिमात्यांच्या चष्म्यांतून शिकवला जातो तो भारतीय दृष्टीनें शिकवावा असे व इतर तपशीलाबद्दल मतभेद होण्याचा संभव आहे. पण एकंदर जें शिक्षण मिळतें तें व्यर्थ आहे ही ओरड योग्य वाटत नाहीं.

## राजकीय पक्षाचें प्रचारसाधन!

शिक्षणाच्या विरुद्ध ओरड हेंच एक विद्यार्थ्यांचें मन चाळवण्याचें कारण नसतें. राजकीय पक्षांना थोड्या पैशांत मोठा प्रचार करायला विद्यार्थी हें एक अतिप्रभावी साधन असतें. गेल्या वर्षी लखनौ विद्यापीठांत स्टूडंट्स्-युनियन वरून जें मोठें भांडण झालें त्याची दखल दुर्दैवानें आपल्या इकडील पुढाऱ्यांनीं घेतली नाहीं. पण त्याचें मूळ फारच उद्बोधक आहे. तिकडे विद्यार्थ्यांचा एक संघ आहे, व त्यावर विद्यापीठाच्या अधिकाऱ्यांचें नियंत्रण व ढवळाढवळ नसावी हें विद्यार्थ्यांचें म्हणणें सकृत्-दर्शनी रास्त वाटतें. पण विद्यार्थ्यांचें – म्हणजे संघचाल-कांचें – म्हणणें असें कीं ह्या संघांत प्रत्येक विद्यार्थ्यानें आलें पाहिजे, इतकेंच नव्हे तर संघाची वार्षिक फी कॉलेजें व युनिव्हर्सिट्यांनीं मुलांकडून शिक्षणाची फी गोळा करतानां सक्तीनें गोळा करून संघाच्या हवालीं केली पाहिजे! अशा तऱ्हेनें हजारो रुपये फी गोळा होते व ती सेक्रेटरी व त्यांचे सूत्रचालक राजकीय पक्ष त्यांच्या ताब्यांत जाऊन गुंडगिरी राजरोसपणें चालते. उत्तरे-कडच्या बऱ्याच विद्यापीठांतून हे संघ अस्तित्वांत आहेत व ते इतके बलवान् आहेत कीं कित्येक विद्यार्थ्यांना ह्या गोष्टीचा वीट आला असूनहि मोठ्यानें बोलण्याची सोय नाहीं. कारण लागलीच मारपीट होते. शिस्त, शिक्षण व परीक्षा – कशाच्याच बाबतींत नियंत्रण रहात नाहीं. मुलें अभ्यास करीत नाहींत. चार उनाड मुलांना प्रश्नपत्रिका जड गेल्या कीं भर मंडपांतच मारामारी व आरडाओरडा सुरूं होतो. मुलाला नापास केल्यावरून शिक्षकाला चोप व प्रसंगीं शिक्षकाचा खूनहि झाला आहे. अशी परिस्थिति सर्वस्वीं येथें आली नाहीं. पण गेल्या वर्षी कांहीं विद्यार्थ्यांनीं पुण्याच्या रस्त्यांत एका वय-








स्कर प्रोफेसरांना मारलें तरी विद्यापीठानें त्याची कांहींच दखल घेतली नाहीं ह्यावरून लौकरच उत्तरेकडील परिस्थिति इकडे येईल अशी भीति वाटते.

## विद्यार्थ्यांची व पालकांची बेपर्वाई

मुलांना शिक्षण उत्तम मिळावें, मुलांनीं परिश्रमपूर्वक शिकावें व ते काय शिकले ह्याची नीट चांचणी व्हावी अशी इच्छा असेल तर शिक्षणाबद्दल व शिक्षकाबद्दल समाजाची भावना आदराची व प्रेमाची पाहिजे, इतकेंच नव्हे तर शिक्षकांशीं सहकार्य झालें पाहिजे. चांगली परीक्षा म्हणजे कठीण परीक्षा व जितकीं जास्त मुलें नापास तितका शिक्षणाचा दर्जा उच्च हें समीकरण आम्हां शिक्षकांना कबूल नाहीं. पण विद्यार्थ्यांच्या व पालकांच्या म्हणजे पर्यायानें समाजाच्या बेपर्वाईनें तसें होतें खरें.

पुण्यांतील फर्ग्युसन कॉलेजांतील इंटर सायन्सचा वर्ग उदाहरणादाखल घेऊं. त्या वर्गांत एकंदर चारशें-साडेचारशें विद्यार्थी असतात. त्या विद्यार्थ्यांना वर्षभर वर्गांत हजेरी द्यावयाची असते, प्रयोग करावयाचे असतात, निबंध लिहावयाचे असतात व तिमाही, सहामाही व नऊमाहीची परीक्षा झाली कीं वार्षिकला बसावयाचे फॉर्म दिले जातात. फॉर्म देतांना हजेरी, प्रयोग, निबंधलेखन किती प्रमाणांत आहे हें पाहून, त्याशिवाय झालेल्या तीन परीक्षांत मिळून एकेका विषयांत निदान एकदां तरी पास झालें पाहिजे असा नियम आहे. हा नियम मोठा कठीण आहे असें कोणीहि म्हणणार नाहीं. जीं मुलें तिमाही व सहामाहींत नापास होतात त्यांच्या पालकांना मुलाचे मार्क पाठवून, 'तो अभ्यास करीत नाहीं, त्याला समज द्यावी' अशी विनंति करण्यांत येते. फॉर्म मिळण्यासाठीं काय नियम आहे हें विद्यार्थ्यांना वर्षारंभीं व अधूनमधून सांगण्यांत येतें. चारशें-पन्नास पैकीं २५८ सर्व परीक्षांत सर्व विषयांत पास होते, १४९ सर्व परीक्षा मिळून एक एका विषयांत एक एकदां किंवा दोंनदां पास असे होते व ४३ असे निघाले कीं ते कुठच्याहि विषयांत पास नाहींत. लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी कीं ह्या ४३ त एकहि मुलगी नाहीं. वर्गांत मुलींची संख्या ४० वर आहे. ह्या ४३ तूनहि ज्यांनीं निबंध लिहिले होते, ज्यांना शेंकडा २५ वर तरी मार्क मिळाले आहेत असे काढून शेवटीं १७ असे राहिले कीं, त्यांनीं मुळींच अभ्यास केला नसल्यामुळें त्यांना फॉर्म मिळाला नाहीं. मुलगा तिमाही – सहामाहींत नापास झाला असें कळवूनहि ज्यांनीं दखल घेतली नाहीं असे बरेच पालक मुख्याध्यापकास भेटावयास येऊन 'उरलेल्या दोन महिन्यांत मुलगा अभ्यास करील, फॉर्म द्या' म्हणून विनंति करून गेले. पुरेसा पैसा नसल्यामुळें लोकाश्रयावर चालणाऱ्या संस्थांच्या चालकांना हे दिवस किती मनस्तापाचे गेले असतील त्याची कल्पना इतरांना येणें कठीण !

इंटर सायन्सचा रिझल्ट पाठवलेल्या मुलांच्या शेंकडा ६५ टक्क्याच्या जरा वर फर्ग्युसनमध्यें साधारणपणें लागतो तसाच यंदाही लागेल असें धरून चाललें तर असें दिसून येईल कीं ४५० – १७ = ४३३ पैकीं २८६ विद्यार्थी पास होतील; त्यांतील २५८ सर्वच्या सर्व (आजारी पडले नसल्यास) व इतर २८ ते ३० असणार. आणखी दहाची भर घातली तरी मूळच्या ४५० तले १५४ खालीं राहणार. ह्याची जबाबदारी शिक्षक, पालक, विद्यार्थी व परीक्षापद्धति ह्या चारांवर आहे असें धरून चाललें, तर शिक्षक अभ्यासक्रम संपवतो का, मुलांच्या वह्या तपासतो का व प्रयोग नीट होतात का – ह्या प्रश्नांचें उत्तर वर दिलेल्या पद्धतींत थोडेबहुत मिळतें. विद्यार्थ्यांकडून योग्य प्रमाणांत अभ्यास करून घेण्याची काळजी घेतात असें म्हणण्यास हरकत नाहीं. शेंकडा ३३ टक्के ह्या सर्व पद्धतीचा फायदा घेतात. उरलेले तितकासा घेत नाहींत व शेकडा १० टक्के मुळींच घेत नाहींत. फॉर्म दिला नाहीं तर पालक विनंति करावयास येतात. विद्यार्थी दहादा खेपा घालतात. वर्ष फुकट गेलें म्हणून त्यांना वाईट वाटतें पण आपल्या कर्तव्यांत कसूर झाली असें विद्यार्थी व पालक दोघांनाहि वाटत नाहीं. 'आम्ही फी देतों, नापास झालों तर आमचे पैसे जातील तुमचें काय वेचतें ?' अशी त्यांची विचारसरणी असते. 'तुमचा मुलगा तासाला येत नाहीं. जरा त्याला कांहीं सांगा' अशी विनंति कांहीं पालकांना केली तर त्यांनीं मुलाचें नांव एका कॉलेजांतून काढून दुसरीकडे घातलें, असेहि प्रकार घडलेले आहेत.

## कष्टाशिवाय फळाची अपेक्षा !

कर्मविपाक व कर्मफळाची कल्पना ही हिंदुसंस्कृतीचा गाभा म्हटला तरी चालेल. पण आज सरसकट

सर्वांनाच त्याचा विसर पडलेला आहे. कर्माप्रमाणें फळ ही साधी गोष्ट समजेनाशी झाली आहे. कष्ट न करतां पैसे कसे मिळतील, शक्य तितकें कमी काम करून बढती कशी मिळेल, अभ्यास न करतां पास कसें होऊं – ह्याच विवंचनेंत जो तो असतो. बरें, अभ्यास केला नाहीं, कॉपी केली तर नापास होणें, किंवा त्याच वर्गांत रहाणें ही शिक्षा भोगावयाची मनाची तयारी नसते. " मी अभ्यास केला होता पण आकसानें मला नापास केलें किंवा यंदा पेपरच जड होते " अशी भाषा मग सुरू होते. कॉपी केलेले विद्यार्थी दरवर्षी येतात. " यंदा चुकलें, आम्हाला पास करा, पुन्हा असें वर्तन करणार नाहीं " असें सर्वांचें म्हणणें असतें. कॉपी करणाऱ्याचे खरोखर दोन अपराध असतातः एक अभ्यास न केल्याचा व दुसरा चोरी केल्याचा. पण त्याला वाटतें, जरी अपराध केला तरी लोटांगण घातलें कीं शिक्षा मिळूं नये. विद्यार्थिदशेंत खरोखरच कामाचा वेळ थोडा असतो. बराच वेळ सुट्टीचा व खेळण्याचा असतो. कामाच्या वेळीं मन लावून, झटून अभ्यास करणें हें कर्तव्य आहे असें बहुसंख्य मुलांना वाटत नाहीं. पास व्हावयाची इच्छा प्रत्येकाला असते, पण तें साध्य होण्यास कष्ट हेंच एक साधन आहे हें कळत नाहीं. परीक्षेला दोन महिने राहिले कीं दिवे जाळण्यास सुरवात होते. लायब्ररींतल्या बुकांवर सर्वांची धाड पडते. मग पाळ्या सुरू होतात व कोणाचेंच वाचन नीट मनन-पूर्वक होत नाहीं. वर्गांत जसजसा अभ्यास होतो, तस-तसें वाचन व टांचणें करीत गेल्यास शरीराला व मनाला अभ्यासाची व व्यवस्थितपणाची संवय लागेल व ह्याच संवयी पुढच्या आयुष्यांत स्वतःच्या व राष्ट्राच्या उन्नतीला उपयोगी ठरतील.

परीक्षापद्धतीचा दोष म्हणावा तर ह्या एका उदाहर-णावरून निदान एवढें तरी सिद्ध होतें कीं विद्यार्थ्यांची अभ्यासाची चांचणी ह्या दृष्टीनेंच नुसता विचार केला तर परीक्षेचा निकाल जवळजवळ आधींच ठरल्या-सारखा दिसतो. म्हणजे चांचणी बहुतेक बाबतींत योग्य होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. प्रथम श्रेणीचा विद्यार्थी क्वचित् द्वितीय श्रेणींत येईल; अभ्यास न केलेला एकादा विद्यार्थी दोन महिने रात्रीचा दिवस करून कदाचित् कसाबसा पास होईल ! पण साधारणपणें परी-क्षेचा निकाल वर्षाच्या कामाच्या अनुरूप असतो असें दिसतें. म्हणजे सध्याच्या परीक्षापद्धतीनें विद्या-र्थ्यांवर अन्याय होतो हें म्हणणें बरोबर नाहीं. त्यांतील दोष दुसरे आहेत. परीक्षा कशा असाव्यात ह्याबद्दल विद्यार्थी, पालक व शिक्षक ह्यांची प्रत्येकाची कल्पना निरनिराळी असते. विद्यार्थ्याला वाटतें कीं अभ्यासाचीं पुस्तकें शक्य तितकीं कमी असावींत, व त्यांतलाहि जो कमींत कमी भाग वाचून पास होणें शक्य आहे तो शिक्षकांनीं दाखवून द्यावा. पालकानें बहुधा विचार केलेलाच नसतो. एकदां मुलगा, मुलगी पास होऊं दे म्हणजे झालें असें त्याला वाटतें. आम्हांला म्हणजे शिक्षकांना वाटतें, शिकविलेल्या विषयाचें जास्तींत जास्त ग्रहण केलें अशी खात्री पटावी.

सध्यांच्या परीक्षा बहुधा वर्षाच्या किंवा दोन वर्षा-च्या शेवटीं असतात. व त्यावेळीं सर्व विषयांची एक-दम परीक्षा होते. परीक्षेचे पासाचे मार्क साधारणपणें शेंकडा ३३ असतात. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे शिकवल्यापैकीं ⅔ कळलें नाहीं तरी मुलगा पास होतो, हें योग्य वाटत नाहीं.

## सध्यांच्या परीक्षापद्धतींतील दोष

सध्यांच्या परीक्षापद्धतीचा दोष म्हणजे तीवरून नीट चांचणी होत नाहीं हा मुख्यत्वें नसून तीमुळें मुलांना अभ्यासाची संवय लागत नाहीं व सर्व विषय एका वेळीं तयार ठेवण्याचा ताण पडतो असे दोन आहेत. हे दोन्ही दोष परस्परसापेक्ष व परस्परपूरक आहेत. मुख्य परीक्षा वर्षाशेवटीं किंवा दोन वर्षांशेवटीं आहे ह्या भावनेनें विद्यार्थी प्रथम प्रथम अभ्यास करीत नाहीं. अगदी गळ्याशीं आलें म्हणजे दुसऱ्यानें चावून मऊ करून दिलेलें अन्न खावें त्याप्रमाणें नोट्स, प्रश्न व त्यांचीं उत्तरें एवढेंच बघून कसाबसा पास होतो. सारखा थोडाथोडा पण अखंड अभ्यास, वाचन, मनन व लेखन ह्याची संवय लागत नाहीं; शिकलेले विषय उत्तम व उपयोगी असूनहि त्यांची गोडी लागत नाहीं; जिथें नोट्सवरच भागवून नेतात तेथें पाठ्य पुस्तकाचें वाचन होत नाहीं हें सांगणें नलगे. मग बाहेरच्या आनुषंगिक वाचनाबद्दल तर विचाराव-यास नकोच.

वर्षाच्या शेवटीं शिकवलेल्या सर्व विषयांची आ-मूलाग्र परीक्षा घ्यावयाची म्हणजे एका वेळीं हजार-दीड-हजार पानांतील निरनिराळ्या विषयांवरील विवेचन

ध्यानांत ठेवावें लागतें. विषयाची सर्वसाधारण कल्पना असूनहि एखादाच प्रश्न अगदीं तंतोतंत न आला तर बरेच मार्क जातात. त्याऐवजीं अधूनमधून निबंधलेखन व तिमाही, सहामाही अशा परीक्षा घेतल्या तर शिकवणें व परीक्षा घेणें ह्या दोन्ही क्रिया बरोबरीनें चालूं रहातील. वार्षिकला बसणारा विद्यार्थी सर्व विषयांत सर्व परीक्षांत पास असला पाहिजे म्हणजे वार्षिकला फक्त शेवटच्या तिमाहींत झालेल्या भागावर बहुसंख्य प्रश्न व एखाद-दोन पूर्वींच्या उजळणीचे प्रश्न असा पेपर काढतां येईल.

असें करण्यानें प्रत्येक वेळचा पेपर दोनतीन प्रश्नांचाच राहील, विषय मोजका राहील व वर्षाशेवटीं ३३ टक्के ज्ञानावर पास न होता विद्यार्थी ५५ ते ८० टक्के ज्ञानावर पास होईल शिवाय वारंवार परीक्षा व निबंध-लेखनामुळें विद्यार्थ्यांना पहिल्यापासून अभ्यास करावा लागेल व अध्यापकाला पहिल्यापासून नीट व नियमित शिकवून दर तिमाहीला नेमलेला विषय संपवावा लागेल.

असल्या परीक्षेला दोन गोष्टी अवघड आहेत. विद्यार्थी नापास झाला म्हणजे त्याला खालच्या विभागांत रहावें लागेल. वरच्या विभागांत परत मोजक्या भागाची परीक्षा असल्यामुळें नापास विद्यार्थ्याला वर ढकलून चालणार नाहीं. दुसरें, अशा नापास विद्यार्थ्यांच्या शिकवणीची व्यवस्था करावी लागेल.

कांहीं वर्षांत परीक्षा न घेतां वर्षाच्या परीक्षा, हजेरी व निबंधलेखन ह्यांच्यावर विद्यार्थ्यांना वर चढवण्यास हरकत नसावी. उदाहरणार्थ, कॉलेजांतलें पहिलें वर्ष व बी. ए. चें पहिलें वर्ष. मात्र असें करतांना शिकवणी नीट होते कीं नाहीं, हजेरी व निबंधलेखन ह्यांत कसूर झाली नाहीं ना व सर्व परीक्षांचा निकाल योग्य लागला ना ह्यांकडे लक्ष पुरवलें पाहिजे.

शिक्षण व परीक्षा हे दोन नसून एकाच कार्याचेच विभाग आहेत हें समजलें तर मुलांच्या परीक्षा घेणारे व निबंध-लेखन करवणारे व शिक्षक एकच असावेत त्याबद्दल बहुधा दुमत होऊं नये. विद्यार्थी कॉलेजांत आला कीं हजेरीपटावर एक नांव व नंबर ह्यापलीकडे शिक्षकाला त्याची ओळख नसते. पण त्याचें तोंड वर्गांत दिसलें, त्याचे निबंध तपासले, त्याची परीक्षा घेतली म्हणजे तो एक अभ्यासी, किंवा उनाड, हुशार किंवा मध्यम किंवा कमी डोक्याचा--हें शिक्षकाला कळत जातें. त्याची संगत काय, तो वर्तनानें व शीलानें कसा आहे वगैरे कळत जातें. निरनिराळया शिक्षकांच्या एकत्र येण्यानें व अनुभवानें मुलांचें व्यक्तिमत्त्व काय असावें ह्याचा कयासा शिक्षकांना येऊं लागतो व शिक्षक व मुख्याध्यापक ह्यांच्याशीं विद्यार्थीहि कांहींशा आदरानें, धाकानें, हक्कानें व प्रेमानेंहि वागूं लागतो. पुण्यांतील सध्याच्या केन्द्रीकरणाच्या विचित्र पद्धतीमुळें बी. ए. च्या वर्गांत हें सर्व नाहींसं झालें आहे. हजेरी इतकी जुजबी असते कीं दोन महिने हॉस्पिटलमध्यें पडलेल्या एका विद्यार्थ्याची पूर्ण हजेरी लागलेली आहे. निबंध-लेखनाच्या पद्धतीचा फायदा नीटसा मिळतच नाहीं. कारण मुलांना आपल्या कॉलेजच्या वाचनालयांत बसण्यास वेळच मिळत नाहीं. वर्गांतील निम्मी मुलें प्रोफेसरांनीं आधीं कधींहि न पाहिलेलीं असतात. कॉलेजच्या कामावर म्हणजे पर्यायानें शिक्षकांच्या कामावर नियंत्रण असावें म्हणावें, तर कोण शिकवतो व कोण नाहीं त्याची बातमीहि विद्यापीठाला लागत नाहीं. अशा परिस्थितींत मुलांच्या तिमाही अगर सहामाही परीक्षा नीटपणें घेऊन त्यांच्या अभ्यासाची प्रगति जोखणें कठीण आहे.

परीक्षापद्धति अमकीच असावी असें नाहीं. पण शिक्षण व चांचणी बरोबर चालूं रहावी म्हणजे विद्यार्थ्यांना वर्षाशेवटीं भार पडत नाहीं व वर्षभर अभ्यास करावा लागतो. अशासाठीं फक्त परीक्षांचीच पद्धत बदलून चालणार नाहीं तर कॉलेजांतील शिक्षणपद्धति, कॉलेजें व विद्यापीठ ह्यांचे परपस्परसंबंध, नेमलेले विषय व त्यांच्या स्पष्ट मर्यादा आंखलेला शिक्षणक्रम व परीक्षा अशा सर्वांचा एकवेळीं विचार झाला पाहिजे.

असा विचार नीट होऊन फलनिष्पत्ति व्हावयाची तर तो खेळीमेळीच्या, देवघेवीच्या व सहकार्याच्या भावनेनें झाला पाहिजे. एका बाजूनें अधिकारी व एका बाजूनें नोकर ह्या भूमिकेंतून संघर्ष व कडवटपणा मात्र येईल व परीक्षासुधारणेच्या नांवाखालीं एखादें नवेंच भूत विद्यार्थ्यांच्या व शिक्षकांच्या मानगुटीस बसावयाचें -- ह्याची काळजी घेतली पाहिजे.

---








'रूरल क्रेडिट सर्व्हे'चे कांहीं निष्कर्ष– प्रा. ए. रा. धोंगडे

# ग्रामीण जनतेच्या आर्थिक स्थितीचें दर्शन

रिझर्व्ह बँकेच्या गव्हर्नरांनीं १९५१ मध्यें कांहीं सहकारतज्ञ, अर्थशास्त्रज्ञ व शासनाधिकारी यांची एक औपचारिक सभा ग्रामीण भांडवलासंबंधीं चर्चा करण्यासाठीं बोलाविली होती. त्या सभेनें यासंबंधीं एक अखिलभारतीय स्वरूपाची पाहणी ( 'All India Rural Credit Survey' ) करण्याचें काम एका समितीकडे सोंपविलें. या समितींत अध्यक्ष श्री. ए. डी. गोरवाला, सदस्य प्रा. धनंजयराव गाडगीळ व श्री. बी. वेंकटप्पया आणि सदस्य-चिटणीस या नात्यानें रिझर्व्ह बँकेचे संख्याशास्त्रज्ञ डॉ. एन्. एस्. आर्. शास्त्री हे होते. समितीनें आंखलेल्या तीन अहवालांपैकीं एक म्हणजे सर्वसाधारण अहवाल ( General Report ) कांहीं महिन्यांपूर्वी रिझर्व्ह बँकेनें प्रसिद्ध केला आहे. या ५७८ पानी अहवालाचा सारांश रिझर्व्ह बँकेनें आपल्या डिसेंबर १९५४ च्या बुलेटिनमध्यें प्रसिद्ध केला आहे. त्या सारांशाच्या आधारें अहवालाचा थोडक्यांत निष्कर्ष काढण्याचा प्रयत्न या लेखांत केला आहे.

आपल्या देशाच्या ३६ कोटी लोकसंख्येपैकीं जवळजवळ ३० कोटी लोक खेडयांत राहतात. एकूण लोकसंख्येपैकीं शेंकडा ७० लोक शेतीवर किंवा शेती करणाऱ्यांवर अवलंबून आहेत. एकूण राष्ट्रीय उत्पन्नापैकीं निम्में उत्पन्न शेती व तत्सम व्यवसाय यांच्या द्वारें राष्ट्राला मिळत आहे. थोडक्यांत म्हणजे हिंदुस्थान हा खेडूतांचा देश आहे व हे खेडूत मुख्यत्वें शेतकरी, शेतीवरील मजूर किंवा ग्रामोद्योगांत गुंतलेले कारागीर आहेत. हिंदुस्थानची वाढती लोकसंख्या लक्षांत घेतां हल्लींचें आर्थिक उपभोगाचें मान कायम ठेवावयाचें म्हटलें तरी १९५१ मधील शेतीउत्पादन ७ कोटी टन होतें, तें १९६१ मध्यें ८॥ कोटी टनांपर्यंत वाढविणें जरूर आहे. ग्रामीण भांडवलाचा पुरवठा पुरेसा वाढविल्याशिवाय उत्पादनांतील ही २१ टक्के वाढ कशी शक्य होईल ? हल्लींच्या उत्पादनासाठी शेतकरी दर वर्षी एकूण ७५० कोटी रुपयांपर्यंत कर्जाऊ भांडवल वापरतात; परंतु उत्पादन वाढवावयाचें झाल्यास शेतकऱ्यांना याहूनहि ज्यास्त कर्जाऊ भांडवल मिळण्याची व्यवस्था झाली पाहिजे हें उघड आहे.

## कर्जाऊ भांडवल कोठून येतें ?

साधारणपणें शेतकऱ्यास एखाद्या हंगामापासून होणारें उत्पन्न पुढील हंगामापर्यंत पुरविणें दुष्कर होतें. म्हणून शेतीसाठीं म्हणा किंवा उपजीविकेसाठीं अगर लग्नासारख्या समारंभांसाठीं कर्ज काढल्याशिवाय त्याला गत्यंतरच नसतें. समितीनें केलेल्या पाहणींत असें आढळून आलें कीं शेतकरी-कुटुंबांपैकीं शेंकडा ५९ कुटुंबांना कर्ज काढण्यासाठीं कोठल्या तरी धनकोकडे जावें लागतें. कांहीं शेतकरी आपल्या आपल्या शेतीच्या उत्पन्नास जोड म्हणून मजुरी करून किंवा दुसरा एखादा ग्रामोद्योग पत्करून आपला खर्च भागविण्याचा प्रयत्न करतात. असें असलें तरी त्यांनासुद्धां कर्जाऊ भांडवलाची जरूरी भासतेच. हल्लींच्या परिस्थितींत हें कर्जाऊ भांडवल त्यांना कोठून व कसें मिळतें याचा समितीनें केलेल्या पाहणीवरून निष्कर्ष काढतां येतो. शेतकऱ्यांना मिळणाऱ्या कर्जाऊ भांडवलामध्यें सरकारी व सहकारी संस्थांचा वांटा फारच बेताचा आहे. तगावी व इतर कर्जरूपानें सरकारकडून शेतकऱ्यांना मिळणारी रक्कम त्यांच्या एकूण कर्जाच्या शेंकडा ३·३ इतकीच आहे. गेल्या पन्नास वर्षांत झालेली सहकारी संस्थांची प्रगति लक्षांत घेतली तरीसुद्धां सहकारी संस्थांकडून शेतकऱ्यांना मिळणारें कर्जाऊ भांडवल सरकारी भांडवलाइतकेंच अल्प म्हणजे शेतकऱ्यांच्या एकूण कर्जाच्या शेंकडा ३·१ इतकेंच आहे. शिवाय या सरकारी व सहकारी कर्जाऊ रकमा प्रामुख्यानें मध्यम व लहान प्रमाणावर शेती करणाऱ्यांना मिळत नसून त्यांचा फायदा साधारणतः मोठ्या प्रमाणावर शेती करणाऱ्यांनाच होत असतो. या कर्जांचा उपयोग उत्पादन वाढ-








विण्यासाठींच केला जावा यासाठीं असावी तशी देखरेखहि या संस्थांना अद्याप शक्य झाली नाहीं.

कर्जाऊ भांडवल मिळण्याच्या दृष्टीनें शेतकऱ्यांना व्यापारी बँकांचा उपयोग अगदींच थोड्या प्रमाणावर होतो. शेतकऱ्यांच्या एकंदर कर्जाच्या जेमतेम शेंकडा १ इतकेंच कर्ज त्यांना व्यापारी बँकांकडून प्रत्यक्ष रीत्या मिळतें. अर्थात् व्यापाऱ्यांकडून शेतकऱ्यांस मिळणाऱ्या कर्जाऊ रकमेंतील बराचसा भाग अप्रत्यक्षपणें व्यापारी बँकाच पुरवितात असें म्हणणें चुकीचें होणार नाहीं.

सरकार, सहकारी संस्था व व्यापारी बँका यांचा कर्जाऊ भांडवलांतील हिस्सा एकूण शेंकडा ७ इतकाच असल्यामुळें शेतकऱ्यांना कर्जासाठीं इतर खाजगी भांडवलदारांवरच अवलंबून रहावें लागतें. आपल्या नातेवाईकांकडून बिनव्याजी रक्कम म्हणून एकूण कर्जाच्या शेंकडा १४ इतकें भांडवल त्यांना मिळूं शकतें. व्यापारी व कमिशन एजंट यांचेकडून मिळणारें कर्ज एकूण कर्जाच्या शेंकडा ५.५ इतकें असलें तरी या कर्जामुळें आपलें हंगामी पीक धनकोस स्वल्प किंमतींत विकणें शेतकऱ्यांस भाग पडतें. आपणांस लागणाऱ्या कर्जाऊ भांडवलापैकीं शेंकडा ७० इतकें भांडवल मिळविण्यासाठीं शेतकऱ्यांना सावकारांकडे जाण्याशिवाय गत्यंतरच नाहीं. सावकारांकडून कर्ज पाहिजे तेव्हां मिळतें खरें, परंतु त्यासाठीं भरमसाट व्याजाचा दर अद्यापहि द्यावा लागतो. सावकारी नियंत्रण-कायदे बहुतेक प्रांतांनीं लागूं केले आहेत. असें असलें तरी रिझर्व्ह बँकेच्या समितीनें केलेल्या पाहणीवरून असें आढळतें कीं मद्रास, ओरिसा, बिहार, हैद्राबाद व पश्चिम बंगाल या प्रांतांत एकूण कर्जाऊ रकमांपैकीं शेंकडा ८५ चे बाबतींत व्याजाची आकारणी कायद्यानें ठरविलेल्या मर्यादेहून अधिक दरानें केली जाते. इतर प्रांतांतहि व्याजाच्या दराची कायदेशीर मर्यादा कमीअधिक प्रमाणावर उल्लंघिली जाते. थोडक्यांत म्हणजे शेतकऱ्यांना कर्जाऊ रक्कम पुरेशी मिळत नाहीं, जी मिळते ती गरजू शेतकऱ्यांसच मिळते असें नाहीं व योग्य अटींवर मिळते असेंहि म्हणतां येत नाहीं.

ही झाली आजची परिस्थिति. उद्यांचें काय? भविष्यकालांत तरी ग्रामीण भांडवलाचा उपयोग मुख्यतः उत्पादन वाढविण्याकडे झाला पाहिजे. शेतकऱ्यांच्या दीर्घकालीन, मध्यम स्वरूपाच्या व अल्पकालीन भांडवलाच्या गरजा पुरविल्या गेल्या पाहिजेत. कर्जाऊ दिलेल्या रकमेचा वापर काय होत आहे यावर देखरेख असली पाहिजे. कर्जास लायक अशा सर्व शेतकऱ्यांना कर्ज मिळालें पाहिजे, तें पुरेसें असलें पाहिजे व तें स्वल्प दरानें मिळालें पाहिजे. अशा रीतीनें कर्ज पुरवावयाचें तर खाजगी भांडवलदारांवर भार टाकून चालणार नाहीं; कारण आजपर्यंतच्या अनुभवावरून हे भांडवलदार वर सांगितलेल्या कर्जासंबंधींच्या जबाबदाऱ्या पार पाडण्यास असमर्थ ठरले आहेत. कर्जाची ही गरज संस्थांतर्फे भागवावयाची म्हटली तर खेडूत जनतेपर्यंत पोंचणाऱ्या संस्था म्हणजे सहकारी संस्था याच असल्याकारणानें त्यांच्याकडूनच ही जबाबदारी पार पडणें शक्य आहे. थोडक्यांत समितीचें म्हणणें असें आहे कीं, सहकारी संस्था या बाबतींत आजपावेतों अयशस्वी झाल्या असल्या तरी यापुढें त्यांनीं यश मिळविलेंच पाहिजे. हें कसें शक्य आहे हें पटवून देण्यासाठीं समितीनें सहकारी संस्था आजवर यशस्वी न होण्याचीं कारणें काय आहेत याचें मार्मिक विवेचन केलें आहे.

## सहकारि-संस्थांच्या अयशस्वितेची कारणमीमांसा

सहकारी शासनयंत्रांतील उणीवा, लायक माणसांचा अभाव, खेड्यांतील अज्ञान, रस्ते, गोदाम व इतर साधनांची अपुरी वाढ हीं सहकारी संस्थांच्या अपुऱ्या यशाचीं वरकरणी कारणें होत. खरीं कारणें फार निराळीं आहेत व त्यांचा संबंध ग्रामीण अर्थव्यवस्थेच्या स्वरूपाशीं आहे. ग्रामीण अर्थव्यवस्थेंत दोन मुख्य दोष आहेत-एक अंतःस्थ व दुसरा बाह्य. अंतःस्थ दोश हा कीं, ही अर्थव्यवस्था उत्पादन वाढण्याच्या दृष्टीनें कार्यक्षम नाहीं. लहानलहान शेतें, पाटबंधाऱ्यांचा तुटवडा, अन्य धंद्यांची केविलवाणी परिस्थिति, शेतीच्या मागासलेल्या पद्धती, शेतकऱ्यांचा उत्पादनासंबंधींचा आकुंचित दृष्टिकोन आणि त्यांना मिळणारें अपुरें मार्गदर्शन- या सर्व गोष्टी ग्रामीण अर्थव्यवस्थेच्या अंतःस्थ कमकुवतपणास कारणीभूत झाल्या आहेत. बाह्य स्वरूपाचा दोष हा कीं, ग्रामीण अर्थव्यवस्था व शहरी अर्थव्यवस्था यांची घडी ग्रामीण भरभराटीस प्रोत्साहन देण्यास असमर्थ ठरलेली आहे. विशेषेंकरून शहरी अर्थव्यवस्थेचे भांडवलासंबंधींचे








श्री. श्री. रा. टिकेकर

# दिल्लींतला फिल्मी सोहळा

भिन्नरुचींच्या अनेक जनांचें करमणुकीचें एक साधन म्हणून नाटयाची ख्याति आहे. ती सिनेमाला अत्यंत समर्पक रीत्या लागू पडते. म्हणून हल्लीं जिकडेतिकडे सिनेमाचा बोलबाला होतो तितका इतर कशाचा होत नाहीं. प्रत्येक देशांत फिल्मी धंद्याचें महत्त्व वाढत आहे. जनसंपर्काचें उत्कृष्ट साधन म्हणून जागतिक संस्था, प्रचारी राष्ट्रें, व्यापारी, धंदेवाईक सिनेमाचा उपयोग निरनिराळ्या प्रकारें करून घेत आहेत.

फिल्मी धंद्याचें खरेंखुरें महत्त्व आमच्या नव्या सरकारला नव्यानेंच कळलें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. ता. २७ फेब्रुवारी ते ४ मार्च १९५५ हे सहा दिवस राजनगरींत फिल्मी सोहळा भरला होता. साहित्य-नाटक-अकाडमीनें तो भरविला होता—असें पाहिजे तर म्हणावें. या निमित्तानें सिनेमाचें यथार्थ श्रेष्ठत्व प्रत्यक्ष पंतप्रधानांच्या तोंडून ऐकावयास मिळालें. 'फिल्म सेमिनार'चें उद्‌घाटन करतांना त्यांनीं सांगितलें कीं "वर्तमानपत्रें व रेडियो यांच्या एकत्रित प्रभावापेक्षां अधिक प्रभाव 'फिल्म'चा आहे." आमच्या देशांत साक्षरता फारशी नसल्यानें मुद्रित साहित्याचा फैलावहि मर्यादित आहे आणि फिल्मी प्रभावाला 'साक्षरते'ची जरूरी नाहीं, म्हणून जनसंपर्कासाठीं, भाषा-लिपी यांच्या बंधनातीत असलेल्या चित्रपटांचा, बोलपटांचा उपयोग अधिक आहे. दिल्लींतल्या सोहळयासाठीं एकूण ४०–४२ फिल्मी व्यवसायी बोलाविले होते. त्यांत प्रत्यक्ष नट-नटी म्हणजे १ दुर्गा खोटे २ सुप्रभा मुकर्जी ३ नर्गिस ४ नमिता सिंह ५ राजकपूर ६ दिलीपकुमार ७ डेव्हिड ८ किशोर साहू ९ अहीन्द्र चौधरी.

पण त्यांना पहाण्यास कोण गर्दी! सेमिनारच्या सभास्थानीं, त्यांच्या रहात्या ठिकाणीं, जाण्यायेण्याच्या वाटेवर लोकांच्या झुंडीच्या झुंडी जमलेल्या असत! कुठल्याहि राजपुरुषाबद्दल, लोकमान्य पुढाऱ्यांबद्दल इतकें औत्सुक्य लोकांत दिसत नाहीं. पण फिल्मी दुनियेंतल्या तारक-तारकांबाबत मात्र त्यांची ओढ भारी विलक्षण. नट-नटींखेरीज पंकज मलीक, अनिल विश्वास, रंजन, उदयशंकर हे गायन-वादन-नर्तन-पटु, देवकी बोस, विमल रॉय, शांताराम यांच्यासारखे पट्टीचे दिग्दर्शक — आणि इतर तंत्रविशारद यांचाहि समावेश निमंत्रित पाहुण्यांत होता. मुख्य म्हणजे या सेमिनारची कर्ती-धर्ती सूत्र-चालिका देविकाराणी — एके काळची गाजलेली नटी—हिला पहाण्यासाठींहि शौकिन जमत. पण अशा बघ्यांमुळेंच फिल्मी सोहळयाला महत्त्व नाहीं आलें, तर त्या पांचसहा दिवसांत दिलखुलासपणानें धंद्याच्या दृष्टीनें, कलेच्या जोपासनेसाठीं, राष्ट्रहितार्थ फिल्म-वाल्यांनीं काय काय करावें याबद्दल पुष्कळ चर्चा झाली, तिचें महत्त्व विशेष! नुसती वटवट काय कामाची अशी शंका कुणी काढली तर तिचें समाधान असें कीं ही अशी वटवट प्रथम झाली तरच पुढें तींतून कांहीं निष्पत्ति व्हायची.

दिल्लींतल्या फिल्म सेमिनारनें अनेक गोष्टी साधल्या. पहिली बाब फिल्म-धंद्याची प्रतिष्ठा. पं. जवाहरलाल उद्‌घाटनासाठीं लाभले. त्यांनीं त्या धंद्याचा गौरव केला, सेमिनारसाठीं आलेल्यांशीं वैयक्तिक ओळख करून घेतली. शेवटच्या दिवशीं आपल्या 'गरीबखान्यां' त त्या सर्व पाहुण्यांना उपाहारासाठीं बोलाविलें, सवाशीं खेळीमेळीनें 'पंडितजी'



अनुक्रमणिका






पंडितजी ' वागले ही एकच बाब मोठी होय. राष्ट्रपतींच्या निवासस्थानींहि अशीच एक 'पार्टी' झाली ही प्रतिष्ठेची दुसरी बाब. व्ही. के. कृष्ण मेननसारखे राजकार्यधुरंधर मुत्सद्दी लंडन-दिल्ली-न्यूयार्क या राजधान्यांमध्यें उलाढाली राजकारणें लढविण्यांत व्यग्र असतांहि वेळांत वेळ काढून पार्लमेंटची बैठक चालू असतांहि सेमिनारमध्यें दोनदां आले, तास-तासभराच्या 'युक्तीच्या चार गोष्टी' त्यांनीं सांगितल्या, इतर वेळींहि अगदीं आपुलकीनें फिल्मी मंडळींची आस्थेवाईक चौकशी त्यांनी केली – हा सर्व प्रकार उपेक्षणीय कसा समजावा ?

पुण्याच्या 'सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी'चे अध्यक्ष, राज्यपुनर्घटनासमितीचे एक सदस्य व उदारमतवादी राजकारणाचे अध्वर्यु पंडित हृदयनाथ कुंझरूहि राज्यसभेंतून या सेमिनारसाठीं आले. कांहीं वेळ त्यांनीं चर्चा ऐकली. आपल्याला मुलांसाठीं चित्रपट काढले पाहिजेत – त्यांची जरूरी वगैरे आपल्या मनची गोष्ट सांगून ते निघून गेले. या सर्व गोष्टींवरून सिनेमाधंद्याची प्रतिष्ठा नव्यानें भारत सरकारला कळली, पटली असें म्हणतां येतें. कारण या व्यवसायाकडे पहाण्याची दृष्टि बहुधा विकृत असते. धंदेवाईक कसेहि असले तरी कुठलाहि धंदा नीच दर्जाचा ठरत नाहीं, हें तत्त्व आपल्याकडे अद्याप पुष्कळांना पटायचें आहे. सरकार-कारभार चालवितांना तर असा उच्च-नीचभाव बाळगणें अव्यवहारी ठरेल. कांहींहि असलें तरी या सेमिनारमुळें अधिकाऱ्यांनाहि पुष्कळ शिकतां आलें, त्यांच्या दृष्टींतली विकृति – अजीबात नष्ट झाली नसली तरी – बरीच कमी झाली हें खास.

राज्यशकट चालविणाऱ्यांची ही अवस्था, तर मग सामान्य जनतेंतहि असा अपसमज फिल्मी धंदेवाल्यांबद्दल–पर्यायानें फिल्मी धंद्याबद्दलहि–असला तर नवल नाहीं. फिल्मी धंदा आहे तीन पेडांचा – त्रिवेणी मिळून फिल्मी जगत् जगमगतें–चमचमतें – छनछनतें ! पहिला विभाग निर्माते – म्हणजे फिल्म बनवणारे. स्टुडिओ, त्यांतले कामगार, दिग्दर्शक, नट-नटी, गायक, वेषभूषा–रंगभूषा करणारे, कॅमेरा-मन्, रसायन-तंत्रज्ञ या सर्वांची कामगिरी चित्रपट तयार करण्याकडे लागते. म्हणून त्यांचें आद्य श्रेष्ठत्व. बाकीचे दोन्ही पेड–डिस्ट्रिब्यूटर्स व एक्झिबिटर्स ( वितरक व 'थेटर'वाले )– हे मूळ फिल्म तयार होण्यावर अवलंबून असतात. फिल्म तयार झालीच नाहीं तर मग पडद्यावर दाखवायचें तरी काय ? म्हणून या दोन्ही घटकांची दुय्यम पायरी. वस्तुत: डिस्ट्रिब्यूटर हा पैसेवाला सावकार असल्यासारखा आहे. फिल्म तयार झाली कीं निरनिराळ्या 'थेटरां'तून ती दाखवायची. तिची ही मध्यस्थी दलाली वितरक करतो. फिल्म बनविण्यासाठीं स्टूडिओची गरज असते आणि ती दाखविण्यासाठीं थिएटरांची. सबंध हिंदुस्थानांत ६० स्टुडिओ असून २२०० पक्कीं व ८०० फिरतीं थेटरें आहेत. दरसाल सुमारें अडीचशें 'फिल्मी' तयार होतात. असें असतांहि सुमारें सहाशें वितरक या धंद्यांत लुडबुड करतात. त्यांचें कार्य समजण्यासाठीं आणखी थोडा खुलासा केला पाहिजे.

साठ स्टुडिओंत मिळून २५० चित्रपट दरसाल तयार होतात. याचा अर्थ स्टुडिओ–मालकच तेवढे चित्रपट काढतात असा नव्हे. स्टुडिओ भाड्यानें घेऊन फिल्म बनविणारेहि पुष्कळ 'निर्माते' असतात. दर वर्षी सुमारें १७५–२०० चित्रपट अशा 'भाडोत्री' पद्धतीनें निघतात. स्टुडिओ भाड्यानें ठरवून फिल्म काढणारे इतके वीर आहेत. हा झाला देशी चित्रपटांचा–इथें तयार होणाऱ्या फिल्मांचा–विस्तार. यांच्या जोडीस पुष्कळशा फिल्मा बाहेर देशांतून येतात. पैकीं बहुतेक–रुपयांत बारा तेरा आणे–अमेरिकन, कांहीं ब्रिटिश असतात. 'इंग्रजी' चित्रपटासाठीं कांहीं 'थेटरें' खास राखीव आहेत तर कांहींत देशी विदेशी चित्रपट आलटून पालटून







दाखवितात. 'इंग्रजी' थेटरांची चलती सध्यां नाहीं. गोऱ्या सोजिरांसाठीं बव्हंशीं त्यांची योजना असे. तरी सध्यां सुमारें २५० परदेशीं चित्रपट दरसाल आमच्या देशांत येतात. इंग्रजी जाणणारे फार थोडे लोक, इंग्रजी फिल्मसाठीं थेटरें तर अगदींच मोजकीं. तरी देशी फिल्मा बनतात तितक्याच दर वर्षी बाहेरून येतात—असा विचित्र कारभार या फिल्मी धंद्याचा आहे.

पण विचित्र म्हणून उपेक्षणीय खास नव्हे. व्यापारी दृष्टीनें या धंद्याचें महत्त्व अत्यंत वेगळें आहे. जगांत सर्वांत जास्त फिल्मी बनतात अमेरिकेंत. अमेरिकेच्या खालोखाल आमचा नंबर. जपानमध्यें मधूनमधून आमच्यापेक्षां जास्ती फिल्मी बनतात खऱ्या. पण जगांतल्या फिल्म धंद्यांत अव्वल दर्जा अमेरिकेचा तर दुय्यम आमचा. देशांतल्या देशांत पाहिलें तर गुंतलेल्या भांडवलाच्या मानानें हा दुसऱ्या नंबरचा; मजुरीच्या मानानें चवथा आणि गुंतलेले लोक पाहिले तर पांचवा येतो. शिवाय प्रांतिक व मध्यवर्ती सरकारें आणि स्थानिक संस्था यांना मिळून फिल्मी धंद्यांतून मिळणारें उत्पन्न पाहिलें तर या धंद्याच्या तोडीचा इतर कोणताच नाहीं.

आणि उत्पन्नाच्या दृष्टीनें विचार करतां या धंद्याची उपेक्षा न करतां सर्वांनीं त्याची जोपासना केली पाहिजे. दुभत्या गाईकडे दुर्लक्ष करणें वेडे-पणाचें होईल. परंतु खरी गोष्ट अशी कीं दिवसेंदिवस अधिक नवे नवे कर लादणें किंवा नवे नवे निर्बंध घालणें या पलीकडे प्रांतिक वा मध्यवर्ती सरकारचें लक्ष परवांपरवांपर्यंत फिल्मी धंद्याकडे नव्हतें. गेल्या वर्षी 'शामच्या आई'ला लाभलेला राष्ट्रपति-सुवर्णपदकाचा मान, हीच पहिली सरकारी उत्तेज-नाची बाब होय. म्हणजे आज चाळीस-एकेचाळीस वर्षें झालीं—दादासाहेब फाळके यांनीं राजा हरिश्चंद्र हा 'चित्र'पट (—त्या वेळीं तो 'बोल'पट नव्हता—) बनविला तेव्हांपासून आतांपर्यंत या धंद्याची उपेक्षाच सरकारनें केली. सिने-शिक्षण मिळण्याची सोय, परदेशीं उच्च शिक्षणासाठीं स्कॉलरशिपा, येथें यंत्रसामग्रीचा थोडक्यांत पुरवठा, कांहीं यंत्रें बनविण्याची खटपट, तांत्रिक मदत, सल्ला, रसायन-शाळेसारखी सोय सिनेधंदेवाइकांना थोडक्यांत मिळण्याची व्यवस्था—असा कोणताहि प्रकार कुठल्याहि सरकारी प्रेरणेनें झालेला आढळत नाहीं. सेंट झेव्हियर कॉलेजांतली शिक्षणाची सोय मुंबईंत श्री. फाझल-भाई या दानशूर व्यापाऱ्यानें करून ठेवली. बंगलूर, मद्रास इथल्या 'टेक्निकल इन्स्टिटयूट'मध्यें सिनेमा शिक्षणाची थोडी सुरुवात झाली आहे. त्याचप्रमाणें फिल्म्स डिव्हिजन मध्येंहि शिकाऊ उमेदवार घेण्याची योजना आहे. पण हे सर्व प्रकार अगदीं अलीकडचे असून त्यांत मूठभर लोकांची तेवढी सोय होते. तें कांहींहि असलें तरी एवढ्या मोठ्या उत्पन्नाचा हा धंदा सरकारी कृपाकटाक्षास खऱ्या अर्थानें पात्र झाला नाहीं हें खरें.

आपल्या प्रारंभींच्या भाषणांत पंतप्रधानांनीं ही बाब मान्य केली आणि या धंद्यांतल्या लोकांचें एक प्रकारें कौतुकच केलें. कारण सरकार-च्या साहाय्याविना हा धंदा एवढा मोठा झाला—त्यासाठीं कुणा ना कुणाचे तरी श्रम कारणीं लागलेच असले पाहिजेत. आज या धंद्यांतले बहुतेक तंत्रज्ञ प्रत्यक्ष अनुभवानें स्वयं-शिक्षित झालेले आहेत. त्यांजजवळ अद्ययावत् साधनें, यंत्रें, अवजारें नाहींत. त्यांची कर्तबगारी मात्र फारच मोठी म्हटली पाहिजे. अशा प्रतिकूल परिस्थितींतहि त्यांनीं अशा दर्जाचीं 'चित्रें' (= चित्रपट) जनतेला सादर केली, हें नवें तंत्र हस्तगत केलें, त्याचा उपयोगहि चांगल्या प्रकारें केला—या सर्व अभिमानाच्या, कौतुकाच्या गोष्टी होत. मात्र आतांपर्यंत असें जाहीर कौतुक, प्रकट अभिमान आमच्या फिल्मी धंद्याबाबत कुणीं व्यक्त केला नव्हता—तो दिल्लींत पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरूंनीं केला, तेव्हां त्यांचें वैशिष्ट्य












काय वानावें १

अशा या फिल्मी दुनियेंतले निवडक ४०-४२ लोक एकत्र आले. श्री. बी. एन्. सरकार यांच्या अध्यक्षतेखालीं सहाहि दिवस चर्चा झाली. मद्रास हायकोर्टाचे सरन्यायाधीश श्री. राजमन्नार हे संगीत-नाटक-अकाडमीचें अध्यक्ष. ते सरकारच्या डाव्या बाजूस बसलेले असत. सभा गाजली, रंगली, गर्जली देखील. पण किती व्यवस्थितपणें काम चाललें होतें म्हणून सांगावें १ अशा संमेलनांत रुसवाफुगवा, भांडणतंडण—कटुता इत्यादि अनिष्ट प्रकार या नाहीं त्या निमित्तानें कुठून तरी घुसतात. तसें दिल्लीस मुळींच झालें नाहीं. उलट, अगदीं सुरवातीपासून यांत खेळीमेळीचें, एकत्र कुटुंबाचें वातावरण होतें. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं एका प्रचंड कुटुंबांतील 'जांवई-षष्ठी' चें ( जेष्ठ शु.॥ ६ ) स्वरूप या समारंभास आलें होतें. प्रत्येकाची बडदास्त देविकाराणींनीं जावयाला साजेल अशी ठेविली. जातीनें सर्व वास्तपुस्त केली आणि या व्यावसायिक मेळाव्याला घरगुती सोहळ्याचें अगत्य व वैभव प्राप्त करून दिलें. याचें प्रत्यंतर शेवटच्या दिवशीं पहावयास मिळालें. अपूर्व असाच तो समारंभ म्हटला पाहिजे. अंगीकृत धंद्याबद्दल आपणांस कसा व किती अभिमान वाटला पाहिजे, त्यायोगें नवीं नवीं निकटचीं नातीं कशीं जडतात, हें खुद्द देविकाराणींनीं त्याबद्दल अवाक्षरहि न काढतां सर्वांच्या मनावर कायमचें ठसवून दिलें. सांगता करण्यासाठीं—सर्वांचे आभार मानण्यासाठीं त्या उभ्या राहिल्या. "रचिला ज्याचा पाया त्याची बरी उभारणी झाली" म्हणून त्यांना समाधान वाटलें, पण निरोप घेतांना डोळे पाण्यानें भरले. त्यांचा तो छोटा रेशमी हातरुमाल अगदीं अपुरा पडला. शिवाय त्यांची अश्रु पुसण्याची क्रिया पाहून इतरांच्या भावना हेलावल्या. त्यांचेहि नेत्र भरून आले. दुर्गाबाई, सुप्रभा मुखर्जी या तर जातीनें कोमल अन्तः-करणाच्या. पण डेव्हिड, दिवाण शरार यांच्यासारखे प्रबल पुरुषहि त्यांतून सुटले नाहींत. अब्बास, राजकपूर, दिलीपकुमार यांनीं थोडेसें थट्टेवारी नेऊन आपलें हळवें मन छपविण्याचा प्रयत्न केला. अनिल विश्वासांना तर रहावेंच ना १ देविकाराणींचे आभार मानतांना तर या मनोव्यापारांचें स्वरूप परा कोटीला पोंचलें. जुन्या आठवणींची उजळणी झाली. देविकाराणींनीं आपल्या व्यवसाय-बंधु-भगि-नींची ही जी ' खातिर ' केली, त्यांना इतके दिवस दुर्लभ वाटणारी प्रतिष्ठा मिळवून दिली, त्या एकंदर गौरवाबद्दलची कृतज्ञता अश्रुरूपानें सद्गदित कंठानें व्यक्त झाली.

फिल्म सेमिनारमध्यें बरेच ' प्रबंध ' वाचले; त्यांवर पुष्कळ चर्चाहि झाली. त्यांचा धावता परिचय असा:

**डॉ. पी. व्ही. राजमन्नार:** मद्रास हायकोर्टाचे सरन्यायाधीश, संगीत नाटक अकाडमीचे अध्यक्ष. यांनीं ता. २७ रोजीं दुपारीं पहिला प्रबंध वाचला: ' फिल्म : ललित कलेचा आविष्कार. '

**श्री. बी. एन्. सरकार:** सेमिनारचे सभापति. यांनीं "फिल्मी धंदा : त्याची सद्यःस्थिति ' यासंबंधीचा प्रबंध वाचला.

**श्री. एस्. एस. वासन्** ( श्रीनिवासन् हें मूळ नांव, सोईसाठीं लघुरूप ) मद्रासचे प्रमुख निर्माते; 'जेमिनी' स्टुडिओचे मालक-चालक; 'आनंद विकटन' या मद्रासच्या विनोदी साप्ताहिकाचे संचालक-मालक. ' चंद्रलेखा ', ' मि. संपत् ' इत्यादि चित्रपट त्यांचे-च. फिल्म फेडरेशनचे मुख्य आधार. सेन्सारबाबत, एकंदर सरकारी निर्बंधांबाबत—झगडणारे झुंजार वीर.

१ बंगाली समाजांत दरवर्षी " जामाई "-पूजा सासुरवाडीस होते. चमचमीत जेवण, अहेरा-दाखल कापडचोपड, इतर कांहीं ' भेट ' म्हणून निरनिराळ्या वस्तू अशा देणग्या जांवयास मिळतात. ही चाल इतर समाजांतहि रूढ व्हावी अशी जागतिक जांवई-संघाची इच्छा असल्यास नवल नाहीं.








"फिल्म-निर्मिति : आजच्या अडचणी" याबद्दल त्यांचा प्रबंध अत्यंत महत्त्वाचा होता. त्यांत आपला व्यापक अनुभव, धंद्याचे खरें स्वरूप, त्यांत येणाऱ्या अडचणी, त्या दूर करण्याचे मार्ग वगैरेबद्दल त्यांनीं विवेचन केलें आणि पांच 'वर' मागितले:

(१) सिनेमाथेटरें वाटेल तिथें वाटेल तितकीं बांधण्यास मुभा असावी; निर्बंध मुळींच नकोत.

(२) करमणुकीचा कर अजीबाद बंद करतां येत नसल्यास, त्यांत पुष्कळ कपात करावी.

(३) सेन्सारचा सासुरवास कमी व्हावा. अधिक स्वातंत्र्य असावें.

(४) शैक्षणिक, सौंदर्यशाली व कलाप्रधान फिल्म काढण्यास द्रव्यसाहाय्य द्यावें.

(५) फिल्मी धंद्यांतलें मुख्य साहित्य-फिल्म, यंत्रें, अवजारें देशांतल्या देशांत बनविण्याची खटपट व्हावी. -असें झाल्यास फिल्मी धंद्याचा 'कायापालट' होईल हा त्यांचा आशावाद.

**श्री. मोहन भवनानी**-'फिल्म्स' डिव्हिजन या सरकारी फिल्मखात्याचे प्रमुख; साप्ताहिक "न्यूज-रील" व डाक्युमटरी फिल्मसचे निर्माते. यांच्या प्रबंधाचें नांव होतें, त्यांप्रमाणें त्यातील विवेचन नव्हतें. अपेक्षा अशी कीं न्यूज-रील व डॉक्युमेंटरी फिल्म-संबंधीं ते बोलतील. वस्तुतः श्री. भवनानी बोलले १६ मि. मि. फिल्मीबद्दल. त्यांच्यावर जेव्हां प्रश्नांचा भडिमार झाला तेव्हां त्यांनीं खुलासा केला:

"यापेक्षां अधिक मला बोलतां येत नाहीं. थोडे दिवस थांबल्यास मी याच विषयावर अगदीं मोकळेपणानें चर्चा करीन."

याचा अर्थ उघड होता. सरकारी निर्बंधामुळें त्यांना खरेंखुरें मत व्यक्त करण्याची चोरी होती. लवकरच सेवाधर्मांतून मोकळे होतांच चर्चा करण्याची त्यांची तयारी होती.[२]

**सुप्रभा मुकर्जी** - या बंगालमधील ज्येष्ठ व श्रेष्ठ सिने-तारका. (किंवा 'नटी' म्हटलेलें त्यांना अधिक आवडेल.) अभिनयाबाबत झालेली (सिनेमामुळें) प्रगति त्यांनीं मोठ्या मार्मिकपणें संयमशाली वृत्तीनें सांगितली. या प्रबंधावर 'सुंदर व मोहक' भाषणें झालीं तितकीं इतर कोठल्याच प्रबंधावर झालीं नाहींत. दुर्गा खोटे, नर्गिस, दिलीपकुमार, राजकपूर, अब्बास अशांचीं या विषयांवर छोटींछोटीं भाषणें झालीं.

श्री. **आचरेकर** यांचें कार्य मुंबईत फिल्मी धंदेवाईकांस पूर्णपणें ठाऊक आहे. 'आर्ट डिरेक्टर' म्हणजे फिल्मी दुनियेंतले प्रत्यक्ष ब्रह्मदेव अशी त्यांची ख्याति असते. परंतु सृष्टि रचणाऱ्या चतुर्मुखी देवापेक्षां आर्ट डिरेक्टरला 'मय' ही पदवी अधिक योग्य होय. 'मय' असुर असला तरी त्याची कृति आसुरी नव्हती. म्हणून सिने-सृष्टींत 'विश्वकर्म्या'-चा अधिकार गाजविणाऱ्या श्री. आचरेकरांच्या प्रबंधाचें महत्त्व अधिक होतें. 'देखावे' उभारतांना, 'आभास' उत्पन्न करतांना, रंगीत फिल्म काढतांना, कलेकडे लक्ष कसें व किती द्यावें, यासंबंधीं विवेचन त्यांचें होतें.

**सौरेन (शौरींद्र) सेन** (मु. कलकत्ता) यांचा विषयहि आचरेकरांच्या विषयाला पोषक असा पोषाखासंबंधीं होता. जुन्या काळचे पोषाख कसे असावे-कसे होते, त्यांचा तपास कसा व कोठें करावा इत्यादि त्यांची माहिती संशोधकी वृत्तीची द्योतक होती. इतक्या कसोशीनें व आत्मीयतेनें प्रत्येक घटक काम करील तर... !

राजकलामंदिराचे (व पूर्वी 'प्रभात'चे) शांता-

---

२. श्री. मो. भवनानी नुकतेच युरोप-अमेरिकेचा दौरा करून आले आणि सध्यां सेवा-मुक्त होण्यापूर्वीची रजा त्यांनीं घेतली आहे. एका अमेरिकन फिल्म कंपनीचें काम त्यांनीं पत्करलें आहे असें म्हणतात.

राम बापू यांचा प्रबंध फार विचारप्रवर्तक वाटला. फिल्म-निर्मात्याची जबाबदारी कितपत असते, त्यानें कोणत्या बाबींचा विचार करावा लागतो वगैरे विवेचन प्रत्यक्षानुभवाच्या खऱ्या तात्त्विक पायावर आधारलेलें होतें. अमेरिकन चित्रांचें, पोषाखांचें, संगीताचें सही सही अनुकरण करणारांना त्यांनीं दोष दिला. हिंदी फिल्म, अमेरिकन संगीत असा 'विजोड जोडा' करूं नका, आपलेंपण कायम टिकवा, असा त्यांचा सल्ला होता. "'देवदास' ची वैफल्यात्मक वृत्ति आपणांस मुळींच आवडली नाहीं, तिनें नवी पिढी भलत्याच वाटेला लागलेली आढळल्यानें आपण 'आदमी' हा चित्रपट काढला. त्या चित्रपटामुळें एका 'प्रेमभंगी' तरुणानें आत्महत्येचा विचार सोडला" इत्यादि माहिती शांतारामांनीं सांगितली.

मद्रासमधील 'वाहिनी' स्टुडिओंतील कॅमेरामन **मार्कस् बार्टले** यांनीं आपला 'दृष्टिकोन' विशद केला. चित्रपटांचा चित्रकार किती विविध साधनांनीं आपलें कार्य साधतो, याबद्दलचें त्यांचें विवेचन उद्‌बोधक वाटलें. काळयाचें पांढरें–पांढऱ्याचें काळें दाखविणाऱ्या फिल्मच्या साह्यानें, छोटेमोठे तुकडे जोडून काय 'किमया' करतां येते व व ती निर्दोष, कलापूर्ण व समाधानकारक कशी करावी हें त्यांनीं सांगितलें. नव्यानेंच लाभलेल्या 'रंगीत' दृष्टीचाहि त्यांनीं उल्लेख केला, त्या रंगामुळें येणाऱ्या जबाबदारीची जाणीवहि दिली.

**किशोर साहू** यांनीं स्वतंत्र निर्मात्यांची तरफदारी केली. 'स्वतंत्र' याचा अर्थ **परतंत्र**. कारण हे स्वतंत्र निर्माते स्टुडिओबाबत परावलंबी असतात. त्यांची सर्व योजना 'भाडोत्री' स्टुडिओ घेऊन पार पडते. अर्थातच त्यांच्या अडचणी विविध असतात. तरीहि कित्येक उत्कृष्ट चित्रपट अशा स्वतंत्र (म्हणजेच परतंत्र) निर्मात्यांनीं काढले, ही समाधानाची बाब होय. फिल्मी धंद्याबद्दलहि त्यांनीं पुष्कळ वास्तविक माहिती सांगितली. भांडवल व थेटर या धंद्यांतल्या मुख्य अडचणी त्यांनीं नमूद केल्या.

**मधू सिल** (कलकत्ता) यांचा प्रबंध व्यावहारिक दृष्टीनें अत्यंत उपयुक्त ठरेल. ध्वनि-शास्त्रासंबंधीं त्यांचें विवेचन होतें. गाणीं–संवाद यांचें निर्दोष रेकार्डिंग कसें करावें हा शास्त्रीय तंत्राचा विषय. पण त्यांचा एक पेटंट शोध आहे. त्यायोगें मूळ (फिल्मी) संवाद एका भाषेंत असले तर दुसऱ्या भाषेंतील संवादहि त्या फिल्मवर बसविणें सोपें होतें. म्हणजे एका चित्रपटाच्या किंमतींत अनेक भाषेंतील चित्रपट काढतां येतील. अशा 'डबिंग'ला फारसा खर्च येत नाहीं.

**पशुपति चट्टोपाध्याय** (कलकत्ता) यांचें गाऱ्हाणें फिल्मी धंद्यांतील तंत्र-विशारदांच्या वतीनें होतें. ज्याची त्याची चलती होते; फक्त प्रत्यक्ष फिल्म बनविणारे 'टेक्निशियन्स' मात्र पैशाच्या दृष्टीनें, मानाच्या दृष्टीनें, 'मागासलेले' रहातात. असें होऊं नये, त्यांना मानाचें योग्य स्थान मिळावें एवढीच त्यांची मागणी होती.

मुंबईचे **मोहमद अकबर फाजलभाई** म्हणजे सिनेमासाठीं लागणाऱ्या यांत्रिक साधनांचे मोठे व्यापारी. त्यांचा प्रबंध हें सर्व सामान येथें बनविण्यासंबंधीं होता. गेल्या सहा वर्षांत सुमारें ८० लाख रु. चें रेकॉर्डिंग साहित्य व २६० लाख रु. चें प्रोजेक्टिंग साहित्य आपण परदेशांतून आणलें. त्यापैकीं थोडीं कां होईनात यंत्रें, अवजारें, आपण इथल्या इथें बनविण्यास सुरवात कां करूं नये, असा त्यांचा सवाल होता.

**अनिल विश्वास** हे प्रख्यात संगीतज्ञ. त्यांनीं आपल्या प्रबंधांत जुन्या लोकगीतांची थोरवी सांगितली आणि उगाच उठल्यासुटल्या परदेशी संगीताची नक्कल उठविण्यापेक्षां आपल्या जनपदगीतांकडे थोडी दृष्टि आपण वळवावी, तिथें पुष्कळ साहित्य मिळण्यासारखें आहे, पुष्कळ मोहक, आक-








षेक चाली 'अज्ञात' आहेत इत्यादि. त्यांचा आशय कुणालाहि पटण्यासारखा होता.

ऑल इंडिया रेडियो-( दिल्ली ) चे **नरेंद्र शर्मा** म्हणाले कीं सिने-संगीत लिहिणारांनीं आपला दृष्टिकोन बदलला पाहिजे. गाणीं पाहिजेत म्हणूनच चित्रपटांत गाणीं घालूं नयेत. कथेच्या ओघांत तीं बसलीं पाहिजेत, अस्वाभाविक वाटूं नयेत, खटकूं नयेत. आधुनिक फिल्मी तंत्राप्रमाणें गाणीं कमी कमी होत जावींत. कदाचित् बिनगाण्याचेहि बोलपट निघतील.

**दुर्गा खोटे** यांनीं नवीनच दृष्टिकोन सांगितला. नटींनीं समाजाची कोणती सेवा केली ? याबद्दल त्यांचें प्रतिपादन सर्वांनाच संमत होण्यासारखें नसलें तरी तें खोडून काढणें कठिण होतें. आमच्या वाङ्मयांतील चिरजीविनी ( शकुंतला, सावित्री, सीता इत्यादि ) स्त्रियांचीं प्रत्यक्ष चित्रें वठवून त्यांचा प्रभाव आमच्या जीवनावर अधिक व्हावा, अशी कामगिरी त्या त्या भूमिका वठविणाऱ्या नटींचीच होय. या शिवाय 'चंडीदास' मधील 'रामी', 'अछूत कन्ये'तील 'कस्तुरी', 'दुनिया न माने-' मधील 'नीरा' यांनीं घडविलेला लोकमतांतील बदल कमी लेखतां येणार नाहीं. -- त्यांचें दुसरेंहि म्हणणें असें कीं सध्यांची तरुण पिढींतील मुली या 'सौंदर्य – जागृत' आहेत; 'मुखपिष्ट', 'हिम' ('स्नो') वगैरे वापरून चांगलें दिसण्याची धडपड त्या पूर्वींपेक्षां अधिक करतात, यांचें कारण म्हणजे सिने-नटीच होत.

सौंदर्य-जागृतीच्या गुलगुलीत गोष्टींनंतर **आर्. एम्. शेषाद्री** ( मद्रास ) यांचा प्रबंध होता. शेषाद्री म्हणजे आमच्या ( जुन्या काळच्या ) श्रीधर विठ्ठल दात्यांचा आधुनिक अवतार समजावा. हे आय्. सी. एस्. मधले कर्तबगार सध्यां निवृत्तीनंतर एक सिने-थेटर चालवीत आहेत. दक्षिण-भारतीय फिल्मी संघांतले चळवळये हेच. त्यांचा प्रबंध म्हणजे आमच्या सरकारनें फिल्मी धंद्याबाबत काय काय केलें नाहीं याची जंत्रीच समजावी. इतर देशांतील सरकारें आपला फिल्मी धंदा सांभाळण्यासाठीं कोणत्या प्रकारें दक्ष आहेत हें दाखवून शेषाद्रींनीं आमच्या सरकारचे डोळे उघडण्याचा हा छानच प्रयत्न केला आहे. 'विलायती' फिल्म इकडे येते. तिजवर दर फुटी चार आणे एवढीच आयात जकात पूर्वींपासून आहे. इतर सर्व किंमती वाढल्या, दर वाढले, आयात जकातींचें प्रमाण चढलें; मग फक्त परदेशी फिल्मच्या बाबतींतच असें धोरण कां ? 'फिल्म' बनविण्यास किंमत पडली असेल त्या मानानें, अगर त्या फिल्मवर होणाऱ्या कमाईच्या अंदाजानें ही जकात कां घेऊं नये, हा शेषाद्रींचा युक्तिवाद बिनतोड होता. परदेशी फिल्म दाखवून मिळणारें उत्पन्न सारेंच्या सारें परदेशी जातें हेंहि अनिष्ट होय. इतर सर्व देशांत अशा उत्पन्नावर निर्बंध आहेत; तसे आपणहि घालावे-ही शेषाद्रींची मागणी गैर नव्हे. आणखीहि पुष्कळ गोष्टी शेषाद्रींनीं आवेशानें मांडल्या, अधिक थेटरें पाहिजेत हीहि मागणी त्यांनीं केली.

**केकी मोदी** म्हणजे 'वितरण' -( डिस्ट्रिब्यूशन )- धंद्यांतले मुरब्बी. त्यांनीं परकीय चित्रपटांबाबत अनुभव सांगितले. परदेशी चित्रपट इकडे कां आयात होतात, आपल्या चित्रपटांना मात्र तिकडे फारसा वाव कां मिळत नाहीं-वगैरे मोदींचें विवेचन विचारणीय होतें.

**डेविड आब्राहाम** ( मुंबई ) यांनीं सिने-नटांची ( नटींचीहि ) तरफदारी केली. फिल्मी दुनियेंत सर्वांत अधिक मान भूमिका वठविणाऱ्यांना मिळाला पाहिजे, ही मागणी पुष्कळांना रास्त वाटली.

**उदयशंकर** म्हणजे आधुनिक नटराज. त्यांचा प्रबंध अर्थातच नृत्यासंबंधीं होता. 'नाचा'ची भेसळ त्यांना मुळींच आवडत नाहीं. उगाच आपला कुठें

तरी 'नाच' घालणें हेंहि त्यांना पसंत नव्हतें. योग्य पद्धतीचा नाच असावा, नांव देण्यांत लबाडी अगर अज्ञान असूं नये, जरूर तेथें जरूर त्या प्रकारचाच नाच घालावा-अशी त्यांची आग्रहाची मागणी होती.

ख्वाजा अहमद अब्बास यांचे दोन प्रबंध होते : संवाद-लेखकासंबंधीं एक व पट-कथेबद्दल दुसरा. संवादाचें वाङ्मयीन मूल्य पहावयाचें असल्यानें कोणाहि ' येरागबाळा '-कडून तें काम करवून घेऊं नये असें अब्बासचें म्हणणें. कांहीं मराठी चित्रपटांचे संवाद मामा वरेरकर, अत्रे, खांडेकर अशा साहित्यिकांनीं लिहिले आहेत. तशीच रीत अन्यभाषीय चित्रपटांत असावी.

कथेच्या बाबतींतहि त्यांचें म्हणणें असेंच पटण्यासारखें होतें. कथानकाकडे दुर्लक्ष करण्याची कित्येक निर्मात्यांची प्रवृत्ति हानिकारक आहे. कथा-लेखकांना सरकारनें बक्षिसें द्यावीं, त्यांना प्रवासाच्या सवलती असाव्या इत्यादि मागणी अब्बासची होती.

फिल्मी-रसायन-शाळेसंबंधीं तांत्रिक विचार **एन्. सी. सेनगुप्तांनीं** सांगितले. मद्रासच्या ' वाहिनी ' स्टुडिओची रसायनशाळा सांभाळणारे ते. त्यांचा अनुभव मोठा आहे. कसेंतरी ' चित्र ' रसायनांतून बुडवून काढावें - त्यांतील ' शास्त्रीय ' परिमाणाकडे दुर्लक्ष करावें-अशी कांहीं चित्रपटनिर्मात्यांची रीत असते-ती योग्य नव्हे असें सेनगुप्तांनीं बजाविलें.

**एम्. डी. चतर्जी** ( कलकत्ता ) हे स्टुडिओवाले, बंगाल मोशन पिक्चर असोसिएशनचे अध्यक्ष. त्यांचा प्रबंध होता, स्टुडिओंत व्यवस्था कशी असावी, याबद्दल.

**ही** झाली 'प्रबंध'-वाचकांची यादी. प्रत्येक प्रबंधावर चर्चा सुरूं करणारेहि ठरलेले होते. त्यांत राजकपूर, बी. एम्. टाटा, बाबुराव पै, विमल रॉय, पंकज मलिक, दिवान शरार अशीं नवीं नांवेंहि होतीं. त्यामुळें सर्व चर्चा हजर असलेल्या ४०-४२ जणांत मर्यादित होती. डेविड, अब्बास, राजकपूर, यांचें बोलणें बहुतेक प्रत्येक विषयावर होई. कुठली तरी एक सरळ दिसणारी बाब विनोदी पद्धतीनें मांडून डेविड विषयान्तर होऊं देत नसे. अब्बासचा व्यापक अनुभव, बेडर वृत्ति व धंद्याबद्दल खरीखुरी तळमळ त्याला जणू बोलायला लावीत. राजकपूरचें बोलणें आवेशयुक्त-राणा भीमदेवी म्हणाना, आणि मधून मधून पृथ्वीराजांशीं-प्रत्यक्ष जन्मदात्याशीं-दोन 'शब्द' करण्याची पाळी येई. 'तीर्थरूपांना कांहीं कळत नाहीं ' असें म्हणण्याइतकें औद्धत्य न दाखवितां मोठ्या शालीनतेनें वडिलांच्या विस्मरणाचा उल्लेख करीत. वडिलहि एखादे वेळीं चिरंजीवांना अडविणारे प्रश्न विचारीत. हा पिता-पुत्र-सामना एकंदरीनें फार कौतुकाचा व आठवणींत रहाण्यासारखा झाला. दुर्गाबाई जेव्हां बोलत तेव्हां सर्वजण लक्षपूर्वक त्यांचें म्हणणें ऐकून घेत. वादांत थोडें ' गरम ' वातावरण येतेंसें वाटलें कीं शीतल-सुगंध झुळुक आणण्याचें कार्य त्यांचें असें. वासन म्हणजे दक्षिण दिग्गज. शालीनतेचा, जिज्ञासूचा आव आणून ते बोलत. प्रत्येकाला त्यांच्या बोलण्याचा हेतु समजे. परंतु त्यांचें बोलणें खोडून काढण्यास कुणी पुढें येत नसे. दिलीपकुमाराच्या प्रत्येक बोलण्यांत शालीनतेचा अनुभव येई. ' आम्ही नव्या पिढीचे नट. आमच्या पूर्वीच्या पिढीनें अनेक कष्ट सोसून या धंद्याला आजचें स्वरूप आणून दिलें' याबद्दल ते सदैव कृतज्ञता व्यक्त करीत.

ह्या प्रबंधांमुळें व त्यावरील विवेचनांमुळें आमच्या फिल्मी धंद्याचें बहुविध दर्शन होतें. ह्या प्रबंधकारांनीं आपापल्यापुरतें ' दुखणें ' काय आहे याचें वर्णन केलें. त्यांची भूमिका ' दुखणाइता'ची असल्यानें त्यांजकडून रोगनिदान, चिकित्सा, उपाययोजना अपेक्षित नव्हती. तरीहि प्रत्येकानें आपल्या मगदुराप्रमाणें काय काय करावें तें सुचविलें. बहु-







तेकांचा भर "सरकारनें हें केलें नाहीं—तें अवश्य करावें" अशा प्रयोजकभेदी सूचना करण्यावर होता.

परंतु चाळीस वर्षें होऊन गेलेल्या या धंद्याची सुसूत्र संघटना अद्याप असूं नये ही खेदाची गोष्ट होय. वाईट वाटतें तें अशासाठीं कीं अजूनहि अशा संघटनेची जाणीव तीव्रपणें झालेली दिसत नाहीं. दोनतीन वेगवेगळया संघटना आहेत खऱ्या पण त्यांचें कार्य मर्यादित आहे. सरकारशीं 'भांडण्यासाठीं' तेवढी ही संघटना आहे. धंद्यांत कुठल्याहि प्रकारची सुधारणा करण्याचें सामर्थ्य तिच्यांत नाहीं. पर्यायानें हें 'नकारात्मक'च कार्य (सरकारशीं झगडण्यापुरतेंच) त्या संघटनेमार्फत होत आहे. शिवाय आत्मनिरीक्षण करून दोष-निवारणार्थ, गुण-वृद्धयर्थ कांहीं प्रत्यक्ष कार्य करण्यासाठीं लागणारी एकजूट त्या संघटनेंत नाहीं, हें कटु सत्य आहे. मात्र त्यांचींहि कारणें निराळीं आहेत. धंदेवाईक पैसेवाले, नट, स्टुडिओवाले, वितरक व थेटरवाले, तांत्रिक व यांत्रिक 'कामगार'—अशा विविध सहकाऱ्यांचें हितसंरक्षण कुणा एका संस्थेला साधतां येणार नाहीं. सध्यांच्या परिस्थितींत तरी हें परस्परांवर अवलंबून असलेल्यांचें, एकमेकांस 'खाववास' टपलेल्यांचें संमेलन वाटतें. परस्परविश्वासच अद्याप पटण्याइतकें प्राथमिक कार्य झालेलें नाहीं. म्हणून होतें काय तर प्रत्येकजण आपापल्या झरोक्यांतून जगाची कल्पना करून जागच्या जागीं स्वस्थ बसतो.

फिल्मी धंद्याची योग्य चिकित्सा होणें आवश्यक आहे. तो राष्ट्रांतील मोठा धंदा आहे तर त्याची जोपासना झाली पाहिजे. तो चालविणारे योग्य मार्गानें जात नसतील तर त्यांना अधिकारवाणीनें वाट दाखविली पाहिजे. ही ज्येष्ठ व श्रेष्ठ पुढाऱ्यांची जबाबदारी व्ही. के. कृष्ण मेनन यांनीं व हृदयनाथ कुंझरूंनीं ओळखलेली दिसली. बाकी सरकारी गटांत देखील पूर्ण अनास्थाच दिसते. सिनेमा-धंद्यांत परदेशी आयात-निर्यातीचा मुख्य संबंध येतो, म्हणजे व्यापार-धंदे-खात्याचें क्षेत्र आलें. 'सेन्सार' खातें आहे माहिती-व-नभोवाणी-मंत्र्यांच्या कक्षेंतलें. करमणुक व इतर स्थानिक कर राज्य-सरकारांच्या व म्युनिसिपालिट्यांच्या वांटणीचे. एके काळीं ही फिल्म ज्वालाग्राही होती. गेलीं चारपांच वर्षें नव्या प्रकारची, 'सेफ्टी' म्हणतात ती फिल्म येते. साधा कागद लवकर पेट घेईल — पण ही नवी फिल्म इतक्या जलदी जळणार नाहीं, अशी सुधारणा झालेली असतां मध्यवर्ती व स्थानिक सरकारचे जुने निर्बंधच कायम आहेत, त्यांचा अंमल कसोशीनें चालूं आहे. सरकारी आडमुठेपणाचें हें छोटेंच पण देशभर पसरलेलें उदाहरण आहे.

सेन्सारच्या खात्याबद्दल — त्या कात्री लावणाऱ्या अधिकाऱ्यांबद्दल — पुष्कळ ओरड झाली आहे. खरें पाहिलें असतां सेन्सारचें काम योग्य मर्यादेंत व्हावयास पाहिजे; त्यांची 'कात्री' सध्यांच्या मध्यवर्ती कारभारांत सारखेपणानें चालली पाहिजे. परंतु मुळांतच गोंधळ म्हणतात तशी आहे आमच्या सेन्सारची कथा. देशी फिल्मींना वेगळी कातर, जबरदस्त हात, तर विलायती फिल्मींसाठीं नाजुक हात—निराळी हलकी कातर, अशा पक्षपातानें लोकांत असंतोष वाढतो. विलायती चित्रपटांतील कांहीं देखावे बिनदिक्कत ठेवावयाचे, देशी बोलपटांतील तसले भराभर कापायचे हा 'न्याय' कसा म्हणावा ? चित्रपट कुठेंहि तयार होवोत—कुणीहि ते तयार करो, ते पाहणारे प्रेक्षक एकच असल्यानें, त्यांच्या हितार्थ धडपडणाऱ्या सरकारनें एकाच कातरीनें, एकाच हातानें त्यांना वागविलें पाहिजे. परदेशी चित्रपटापासून होणाऱ्या या देशांतल्या उत्पन्नावर मात्र मुळींच बंधन नाहीं—असा वेंधळा कारभार असूं नये. श्री. शेषाद्रींनीं उदाहरण दिलें तें असें : एका परदेशी चित्रपटासाठीं आयात कर ( चार आणे फूट ) झाला वीस हजार

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

रु. आणि त्याचें उत्पन्न पाव कोट रुपयांवर गेलें, तरी सर्व पैसा जसाच्या तसा परदेशी पाठवितां आला.

सर्वांगीण उत्पन्न होत असलेल्या या उद्योग-धंद्याकडे, सरकारांचें (–प्रांतिक व केंद्रीय–) सहानुभूतीचें लक्ष नाही–ही अनास्था लवकर बदलणें जरूर आहे. विशेषतः जेव्हां सरकारच आपल्या साप्ताहिक बातमीपटांची व माहितीपटांची प्रसिद्धि या धंद्यामार्फतच करीत आहे तेव्हां या धंद्याकडे जरा वेगळया दृष्टीनें पाहणें अगत्याचें आहे. सिनेमा-थिएटरें नसतीं किंवा त्यांत दाखविण्यापुरत्या फिल्मी नसत्या, तर नुसत्या बातमीपटांनी व माहितीपटांनीं काम भागेल का ? ते पहाण्यासाठीं प्रेक्षक पैसे देऊन, सध्यां करतात तितकी गर्दी करतील का ? हा साधा प्रश्न या माहिती–नभोवाणी खात्यानें स्वतःस विचारून पहावा. म्हणजे फिल्मी धंद्याकडे योग्य दृष्टिकोनानें बघतां येईल.

सिनेमा–वाल्यांचें गाऱ्हाणें सर्वच रास्त आहे असें मुळींच नव्हे. अधिक थेटरांची त्यांची ओरड जुनी आहे. फिल्म एन्क्वायरी कमिटीनें (–अध्यक्ष स. का. पाटील–) त्यांच्या ओरडीस टेकू दिला असून आणखी भराभर थिएटरें बांधण्यास मुभा असावी असें म्हटलें आहे. मात्र हीं थेटरें कुठें असावीं याबद्दल कुणीं बोलत नाहीं. सेमिनारमध्यें कृष्ण मेनन यांनीं नुसतें ओझरतें सांगितलें : "शाळा, इस्पितळें बांधायचीं सोडून थेटरें बांधावीं तुम्ही सिने-धंदवाले सुद्धां म्हणणार नाहीं. कोणती गरज आधी भागवावी हें तारतम्यानें ठरविलें पाहिजे. लोकसंख्या व थेटरें यांचें ठोकळ प्रमाण बसवून चालणार नाहीं. आमच्या लोकसंख्येचा विचार वेगळया रीतीनें करावा लागेल.

स. १९५१ च्या शिरगणतीप्रमाणें–पांचशेंपेक्षां कमी वस्तीचीं ३,८०,०२० खेडीं; पांचशेंहून अधिक पण एकहजार पेक्षां कमी वस्तीचीं १०४,२६८ खेडीं; एकहजाराहून अधिक पण दोन हजार पेक्षां कमी वस्तीचीं ५१, ७६९ गांवें; दोनहजाराहून अधिक पण पाच हजारापेक्षां कमी वस्तीचीं २०,५९८. एकूण खेडीं-गांवें ५,५६,६५५

या साडेपांच लाख गांवांत तर सिनेमा थेटर बांधतां येणार नाहीं ? यांतील लोकसंख्या तीस कोटींच्या आसपास आहे.

आतां शहरगांवचा हिशेब पाहूं.

एक लाखाहून अधिक वस्तीचीं ७५ (७९) शहरें आपणांकडे आहेत. त्यांत मिळून ७९० थेटरें (सिनेमाचीं) आहेत. म्हणजे एकंदर सात टक्के लोकांसाठीं मिळून तीस टक्के थेटरें आहेत. यावरून काय बोध होतो ? लोकवस्तीशीं थेटरांचें प्रमाण कांहीं बसवितां येतें काय ? एक सिनेमा बारमहा धडपणें चालण्यासाठीं किमान वस्ती हवी किती ? या बाबींचा विचार केला तर सिनेमाची–थेटरांची जरूरी कुठें आहे हा प्रश्नच पडेल. कारण शहरांतील सिनेमा-वरून कांहीं अंदाज लागत नाहीं. जयपूर –( राजस्थान ) ची वस्ती तीन लाख पण सिनेमा थेटरें फक्त चार; तर कोल्हापूर ( महाराष्ट्र ) ची लोक-संख्या पुरी दीडलाखहि नसतां तिथें दहा सिनेमा ! बंगलोरच्या आठलक्ष लोकांना ३३ सिनेमे ! हैदराबाद-सिकंदराबादच्या अकरा लाख लोकांसाठीं ३५ थेटरें, रामपूर –( उत्तरप्रदेश ) ची वस्ती एक-लाख ३४ हजार; पण थेटर एकच. पुण्यांत पांच लाखांसाठीं सव्वीस तर अहमदाबादच्या आठ लाखांसाठीं फक्त वीस. या विषम वांटणीवरून सरासरी काढली तर साधारणपणें तीस-बत्तीस लाख वस्तीस एक सिनेमा हें प्रमाण पडतें. सरासरीनें आलेला हा अंदाज फारसा चूक ठरत नाहीं. कारण एका थेटरांत रोज सरासरीनें ( अखिलभारतीय मानानें ) सहाशें प्रेक्षक ( दोन अगर तीन खेळ ) येतात असा अंदाज धरला तर असा प्रेक्षकपुरवठा बारमहा होत रहाण्यास निदान तीस हजार वस्ती पाहि-जेच. लोकवस्तींत विद्यार्थी, कारखान्यांतले काम-







गार अशांचा भरणा असल्यास ( तीस हजारापेक्षां ) कमी लोकवस्तींतूनहि किमान ( ६०० ) प्रेक्षकांची भरती होईल. वीस हजार ते साठ हजार वस्ती असलेलीं ४०१ गांवें आमच्याकडे आहेत. त्यांपैकीं बहुतेकांत (बिजली असली तर) एक तरी सिनेमा आहेच. फार काय सांगावें पांच हजारांहून कमी वस्तीच्या ठिकाणींही. विजेच्या आनुकूल्यामुळें थेटरें वाढलीं आहेत. पण हीं अपवादात्मक सोडलीं तरी मूळ प्रश्न उरतो तो असा हीं नवीं थेटरें बांधायचीं कुठें ? आणि कुणासाठीं ?

आमच्या फिल्मी धंद्यावर कराचा बोजा जास्त आहे ही ओरड नेहमींचीच आहे. परंतु प्रत्येक देशांतहि तसेंच आहे. कोणत्या देशांत बिनकराची ( अल्प कराची ) व्यवस्था आहे सांगा बरें ? आपल्याकडे सर्व कच्चा-पक्का माल, यंत्रसामग्री, रोजचें लागणारें सिनेमासाहित्य परदेशाहून येत असल्यानें, परदेशी मालावरची जकात त्यावर बसल्यानें, एकंदर कराचा बोजा अधिक वाटतो. पण त्यांपैकीं कांही माल इथें बनविण्याचा प्रयत्न केला आहे कां कुणीं धंदेवाइकानें ? सर्वच बाबतींत " सरकारनें करावें " अशी अपेक्षा घातुक आहे.

सिनेमानें राष्ट्र-भाषा अधिक लोकप्रिय केली, संगीताची मेजवानी हर एकाला मिळण्याची सोय केली; नट-नटींचा एक नवा संच तयार केला—पुष्कळांना काम मिळवून दिलें—प्रचारासाठीं एक प्रचंड यंत्रणा उपलब्ध करून ठेवली—इत्यादि गोष्टींबरोबरच सिनेमाचे दोषहि लक्षांत घेतले पाहिजेत.

एक मुद्दा पुष्कळांच्या नजरेंतून सुटतो. तो असा कीं अपुऱ्या राहिलेल्या, तयार झालेल्या पण न दाखविलेल्या व प्रसिद्ध होऊनहि पडलेल्या चित्रपटांबाबतचें नुकसान कोण सोसतो ? फिल्म तयार व्हायची म्हणजे हजारों लाखों रुपये भराभर ' उडत ' असतात. पण इतकें खरें कीं अशा बाबतींत बुडतात ते मजूरदार सर्वांत अधिक. त्यांच्यावर होणारा अन्याय दूर होण्याचा मार्गच उपलब्ध नाहीं. बहुतेक सारा उपऱ्यांचा कारभार असल्यानें कोर्टकचेरी उपयोगी पडत नाहीं. मजुरदारांनीं रावराब राबावें आणि त्यांच्या मजूरीची मात्र शाश्वती असूं नये; ठरलेली किमान पगारीहि त्यांना मिळूं नये, ही मोठी लाजिरवाणी अवस्था होय. इतर धंदेवाईकांचें ' येणें ' बुडालें तर त्यांची भरपाई अन्य रीतीनें ते करतात; ' बुडीत ' रक्कम धंद्यांत धरलेलीच असते. तसें हातावर पोट असणाऱ्या मजुरांबाबत, तांत्रिक कामगाराबाबत कुठें असतें ? अशी मजुरी किती बुडाली याचा हिशेब कुणी आर्थिक पहाणीनें ठरवील तर या धंद्यांतला अनागोंदी कारभार चवाठ्यावर येईल.

थोडक्यांत सांगावयाचें तर फिल्म सेमिनारमध्यें व्यक्त झालेलीं मतें, अडचणी व उपाययोजना हीं सर्व जशींच्या तशीं स्वीकारार्ह नाहींत; आचरणार्हहि नाहींत. कारण ती फक्त एक बाजू आहे. किंबहुना हें दुखणाइतांनीं आपलें दुःख व्यक्त केलें आहे. आतां तज्ज्ञांनीं बसून त्या गाऱ्हाण्यांचा विचार करून सरकारच्या सल्ल्यानें काय करावयाचें तें ठरवावें लागेल. नागरिक म्हणून आपण या बाबतींत अधिक लक्ष घालून सत्यशोधन केलें पाहिजे. केवळ सरकारी धोरण तेवढें बरोबर बाकी सब झूट—असें मानणें रास्त नव्हे. फिल्मी संगीत, बातमीपटांबाबत थेटरवर सक्ती, सिनेमावाल्यांचा कर चुकविण्याच्या कारवाया, सिनेव्यवहारांतील 'काळा' बाजार, आमच्या चित्रपटांना परदेशची पेठ, इथें कच्चा माल तयार करण्याची योजना, परदेशी चित्रपटधंदेवाईकांच्या येथील कमाईवर निर्बंध इत्यादी अनेक वादग्रस्त मुद्दे अधिक विस्तृत चर्चेशिवाय कळणार नाहींत. त्याबाबत पुनः केव्हां तरी सवडीनें लिहितां येईल. सिनेमाचा धंदा हा राष्ट्रीय दृष्ट्या फार महत्त्वाचा आहे. त्याबाबत आजपर्यंत उपेक्षा झाली, त्यांत विचारवंतांनीं अधिक लक्ष घातलें पाहिजे, एवढें जरी सेमिनारमुळें कळलें तरी पुष्कळ कार्यभाग साधल्यासारखें होईल.










तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# रंगून येथील सांस्कृतिक परिषद्

गल्यो महिन्यांत, फेब्रुवारी १७, १८, १९ व २० या दिनांकीं रंगून येथें आशियाई राष्ट्रांच्या प्रतिनिधींची संस्कृतिविषयक विचारविनिमय करण्याकरितां परिषद् भरली होती. या परिषदेस अत्यत निवडक असे ६० प्रतिनिधि उपस्थित होते. या परिषदेची तयारी आशियाच्या ' संस्कृति-स्वातंत्र्य-समिती'चे कार्यवाह श्री. प्रभाकर पाध्ये व श्री. व भ. कर्णिक यांनीं केली होती. ब्रह्मदेशांतील संस्कृति-स्वातंत्र्य-समिति व ब्रह्मी राज्यसरकार या दोघांच्या सहकारामुळें व उदार आतिथ्यामुळें ही परिषद् चांगली थाटांत पार पडली. या परिषदेच्या यशाचीं उत्तम अशीं दोन गमकें होत. संस्कृतीसंबंधीं मूलगामी चर्चा करण्यास आधारभूत म्हणून उपयोगी पडतील असे २४ निबंध आशियांतील मोठमोठया विचारवंतांकडून परिषदेस सादर केले होते. उदाहरणार्थ : प्राचार्य गोकाक यांचा " भारतांतील आधुनिक कला व सौंदर्यशास्त्र ", प्रा. गोवर्धन पारीख यांचा " आशियांतील राष्ट्रांचें पुनरुत्थान ", ईस्टर्न इकॉनमिस्टचे दिल्ली येथील संपादक ड कॉस्टा यांचा " आशियाचा आर्थिक विकास ", टोकिओ विश्वविद्यालयाचे प्रा. नाकामुरा यांचा ' आशियांतील धर्माची जीवनशक्ति ', मायकेल पोलान्यी यांचा ' स्वातंत्र्याचें भविष्य ', इंडोनेशियाचे तगदीर अलिस जबाना यांचा " आपल्या संस्कृतींतील आधुनिक व परंपरागत मूल्यें " फिलिप्स स्प्रॅट यांचा " आशियांतील सांस्कृतिक स्वातंत्र्याला हुकूमशाहीचा धोका ", टोकिओ विश्वविद्यालयाचे ताकेयामा यांचा ' बुद्धिजीवी वर्ग व कम्युनिझम् ' इत्यादि निबंध अत्यंत विचारप्रवर्तक होते. निबंधांच्या प्रती प्रतिनिधींना पहिल्याच दिवशीं वाटल्या होत्या. त्यामुळें प्रतिनिधींना त्यावर वाचन करण्यास अवसर मिळाला होता. परिषदेचें काम प्रतिदिन एकंदर ७ तास चालत असे. तरी प्रतिनिधि केव्हांहि कंटाळलेले दिसले नाहींत. रंगून शहरांतील एका सुंदर सरोवराच्या तीरावरील ' युनियन क्लब'च्या विशाल महालांत परिषदेचीं अधिवेशनें व चर्चा झाल्या. हवा समशीतोष्ण होती. खाद्यपेयांची चंगळ होती. आणि रोज संध्याकाळीं नृत्य, नाट्य, गायन, वादन इत्यादि करमणुकीचे कार्यक्रम व मेजवान्यांचे कार्यक्रम झाले. त्यामुळें सर्वच गोष्टी संस्मरणीय अशा झाल्या. प्रतिनिधींचा निवास एकत्रच असल्यामुळें थोडक्याच अवधींत आपसांत परिचय होऊन खेळीमेळीच्या चर्चांनी व प्रसंगोपात्त संवादांनीं तो दृढ झाला. मैत्रीचें वातावरण टिकल्यामुळें भावनांना स्निग्धता आली.

श्री. मिनू मसानी जयप्रकाश नारायण, प्रभाकर पाध्ये व कर्णिक यांच्या सौजन्याची छाप सर्व प्रतिनिधींच्या मनावर चांगली पडली. जयप्रकाश यांना ओळीनें चारी दिवस जवळून पाहण्याचा योग आल्यामुळें त्यांचा साधेपणा व गंभीर व्यक्तिमत्त्व आशियांतील प्रतिनिधींना संस्कृतीचें थोर प्रतीक म्हणून आकर्षक वाटलें. या परिषदेवर अर्थशास्त्रज्ञ या नात्यानें दिल्लीचे ड कॉस्टा यांचा प्रभाव चांगला पडला. पाकिस्तानचे कायदेपंडित ए. के. ब्रोही यांचें अस्खलित वक्तृत्वहि श्रोत्यांना अनेक वेळां ऐकावयास मिळालें. जपानच्या प्रतिनिधींमध्यें एकापेक्षां एक सवाई अशीं अनेक चमकदार रत्नें होतीं. प्रा० नाकामुरा हे संस्कृतचे उत्कृष्ट पंडित; प्रा. ताकेयामा हे जर्मन वाङ्मयाचे पंडित व मानसशास्त्राचे सूक्ष्मदर्शी प्रज्ञावंत; त्याचप्रमाणें वातानाबे हे इंग्लिशवाङ्मयाचे व राज्यशास्त्राचे अनुभवी विद्वान्; म्हणून हे प्रतिनिधींच्या ध्यानांत कायम राहिले जपानी मंडळींत एक बडे पत्रपंडित व साहित्यकारहि होते. ब्रह्मदेशाचे कांहीं प्रतिनिधी फार मोठ्या योग्यतेचे होते. उच्चतम न्यायालयाचे न्यायाधीश ऊ चान् तून हे बुद्धधर्मी थोर तत्त्वचिंतक तर खरेच; परंतु त्यांच्या औदार्यामुळें, वैचारिक मार्गदर्शनामुळें व विनयानें परिषदेला साफल्य आलें.

या परिषदेंत ठरावांना विशेष महत्त्व नव्हतें. विचारविनिमय व तत्त्वचर्चा हेंच या परिषदेचें वैशिष्ट्य

होय. या परिषदेंत कम्युनिस्ट राष्ट्रांचे प्रतिनिधी निमंत्रित केले नव्हते. याचीं मुख्य दोन कारणें होत. एक कारण असें कीं, मानवी संस्कृतीची प्रेरक शक्ति वैचारिक स्वातंत्र्य होय, हा सिद्धान्त या सांस्कृतिक परिषदेचा आधारभूत सिद्धान्त होता. वैचारिक स्वातंत्र्याचा सिद्धान्त कम्यूनिझमला मान्य नाहीं. दुसरें कारण असें कीं, जगांतील परंपरागत विद्यमान संस्कृती व त्यांचें वैचित्र्य मानवी प्रगतीस वर्तमान व भविष्यकाळींहि उपकारक होऊं शकतील, त्यांच्यांत परिवर्तन होणें आवश्यक असलें तरी त्यांचा मूलतः नाश होण्याची आवश्यकता नाहीं असा परिषदेचा मूलभूत सिद्धान्त होता. हाहि सिद्धान्त कम्यूनिझमला मान्य नाहीं. कम्यूनिझमला एकाच प्रकारची संस्कृति सगळया जगांत स्थापन करावयाची आहे. जगांतील विद्यमान भिन्नभिन्न संस्कृतींच्या स्वातंत्र्याला व वाढीला पूरक अशी परिस्थिति व विचार शोधून काढण्याकरितां ही परिषद् भरविली होती. कम्युनिस्ट विचारसरणीशीं व ध्येयवादाशीं मूलतःच विरोध असल्यामुळें त्या राष्ट्रांचे प्रतिनिधि निमंत्रित केले गेले नाहींत.

चर्चेचे लहानमोठे मुद्दे एकंदर तीन विषयांमध्यें वर्गीकरण करून समाविष्ट केले होते. चर्चा भरघोस झाली. परंतु चार दिवस चर्चा होऊनहि तपशिलांतील अनेक महत्त्वाचे मुद्दे स्पर्श न करतांच राहून गेले, असें वाटलें. सर्व चर्चा इंग्लिशमधूनच झाली; त्यामुळें अनेकांना अभिप्राय सफाईनें व्यक्त करण्यास गैरसोय वाटली. हिंदुस्थान, पाकिस्तान, ब्रह्मदेश व फिलिपाईन या चार देशांतील प्रतिनिधींच्याशिवाय बाकीच्या प्रतिनिधींना इंग्लिश बोलण्याचा सराव फारच कमी दिसला; परंतु आलेले सगळे प्रतिनिधि इंग्लिश उत्तम प्रकारें जाणणारे होते, यांत शंका नाहीं.

आशियांतील नवजागृतीचा अर्थ, आशियांतील संस्कृतींच्या अधोगतीचीं कारणें, सांस्कृतिक स्वातंत्र्याची वाढ करण्यास उपयुक्त साधनें आणि कम्युनिस्ट किंवा अन्य प्रकारच्या हुकुमशाहींच्या प्रभावाची मीमांसा – या मुद्द्यांचा विस्तृत खल करण्यांत आला. त्याबरोबर आर्थिक नियोजन व विकास यांचेंहि समालोचन उद्बोधक रीतीनें करण्यांत आलें.

'ईस्टर्न इकॉनमिस्ट', दिल्ली, या साप्ताहिकाचे संपादक ड कॉस्टा यांनीं आर्थिक नियोजन व लोकशाही-स्वातंत्र्य यांचा परस्परविरोध मानण्याचें कारण नाहीं असा मुद्दा आग्रहानें प्रतिपादिला. त्यांनीं आर्थिक नियोजनासंबंधीं एक महत्त्वाची सूचना अशी केली कीं, आशियाखंडांतील जपानशिवाय अन्य बहुतेक राष्ट्रें आर्थिक दृष्ट्या मागासलेलीं असल्यामुळें सद्यःपरिस्थितीच्या संदर्भांत आर्थिक नियोजन केल्याशिवाय त्यांची औद्योगिक प्रगति होणार नाहीं; त्यांचें दैन्य व उपासमार टाळण्याचा दुसरा उपाय नाहीं. आशियांतील हिंदुस्थान व पाकिस्तानसारखीं राष्ट्रें आपापलें नियोजन स्वतंत्रपणें करीत आहेत. हीं राष्ट्रीय नियोजनें स्वतंत्रपणें अलग चालल्यास आशियाई राष्ट्रांची आर्थिक प्रगति सुसंवादीपणें होणार नाहीं. आशियाई राष्ट्रांचें नियोजन परस्परावलंबी असेंच आंखलें पाहिजे. ब्रह्मदेशांत सध्यां फार महागाई आहे. हिंदुस्तानचा पक्का माल विकत घेण्यास लागणारा मोबदला ब्रह्मदेशापाशीं नाहीं; केवळ तांदुळ त्यांच्यापाशीं आहे. तो तर हिंदुस्थानास नको आहे. अशा प्रकारची विसंगति टाळण्यास आशियाचें आंतरराष्ट्रीय नियोजनच करणें आवश्यक आहे. ड कास्टा यांनी उपस्थित केलेल्या या चर्चेंत भाग घेत असतां पाकिस्तानचे सर्वार हसन यांनीं प्रा. गोवर्धन पारीख यांच्या निबंधांतील नियोजनसंबंधी सूचनांकडे प्रतिनिधींचें लक्ष वेधून घेतलें. श्री. जयप्रकाश नारायण यांनी भूदानचळवळच मानवी स्वातंत्र्य व आर्थिक प्रश्न यांचें कोडें उलगडूं शकते, असें आश्वासन दिलें. परंतु जयप्रकाश नारायण यांचा ग्रामोद्योग-प्रधान अर्थशास्त्रासंबंधींचा आग्रह विद्यमान जागतिक भौतिक शास्त्रीय प्रगतीशीं विसंगत असल्यामुळें अव्यवहार्य आहे अशी विचारवंत प्रतिनिधींची प्रतिक्रिया खाजगी चर्चेंत पुनः पुनः प्रकट झाली. भूदानचळवळीचें नैतिक मूल्य मात्र बहुतेकांना पटलेसें दिलें.

हुकुमशाही प्रवृत्तीचा फार मोठा धोका आशियांतील लोकशाहींना व संस्कृतींना कसा आहे या बाबतींत अत्यंत विचारप्रवर्तक असे मुद्दे तेथें सादर केलेल्या निबंधांत व प्रतिनिधींच्या भाषणांत मांडले गेले. हिंदुस्थानांतील जातिसंस्था ही व्यक्तिस्वातंत्र्याचीं व लोकशाही समतेचीं बीजें नीट रुजूं देणार नाहीं; पाकिस्तानांतील इस्लामी हेका हा धार्मिक

स्वातंत्र्य, सांस्कृतिक स्वातंत्र्य व विशेषतः विचार-स्वातंत्र्य यांना घातक ठरण्याचा संभव आहे; जपानमधील राजनिष्ठा व लष्करी इभ्रतीची भावना साम्राज्यशाही महत्त्वाकांक्षेचें गुप्त परंतु जबरदस्त असें मूळ आहे; आशियांतील राष्ट्रांमधील रूढिप्रियता, अंधश्रद्धा व पारलौकिक विचारसरणीची परंपरा लोकशाही संस्कृतीला व ऐहिक प्रगतीला बाधक आहे – अशा प्रकारचे विचार अनेक प्रतिनिधींनीं व निबंधांनीं व्यक्त केले.

परिषदेस उपस्थित असलेले जपानचे प्रतिनिधि प्रा. नाकामुरा यांनीं एक मजेदार मुद्दा आपल्या निबंधांत असा मांडला कीं, " हिंदुस्तान व जपान-पर्यंतचीं बुद्धधर्मीय राष्ट्रें यांची धार्मिक परंपरा विचार-स्वातंत्र्याला पोषक आहे. विचारस्वातंत्र्य आणि लोकशाही राज्य यांचाच अभेद्य सांधा असतो असें म्हणण्याचें कारण नाहीं. प्राचीन हिंदुस्थानांत राजसत्ता असतांना धार्मिक स्वातंत्र्य किंवा वैचारिक स्वातंत्र्य हें कळसास पोचलें होतें; धार्मिक स्वातंत्र्य ही प्राचीन हिंदूंनीं जगाला दिलेली एक मोठी देणगी आहे. " धर्मविषयक चर्चेच्या या संदर्भांत तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं अशी समस्या उपस्थित केली कीं, " विद्यमान आशियाई राष्ट्रांच्या ऐहिक प्रगतीच्या महत्त्वाकांक्षांचा, मोक्षाच्या वा निर्वाणाच्या अंतिम ध्येयवादाशीं तर्कदृष्ट्या मौलिक विरोध आहे. मोक्षाच्या ध्येयाच्या पोटांत ऐहिक आकांक्षांचें विसर्जन अभिप्रेत असतें. " या समस्येचें तर्कशुद्ध उत्तर कोणासच देतां आलें नाहीं.

जर्मन वाङ्मयाचे महापंडित असलेले जपानी प्रतिनिधि ताकेयामा यांनीं "कम्यूनिझम् आणि जपानी बुद्धिजीवी वर्ग" या निबंधांत एक अत्यंत मूलगामी सिद्धान्त मांडला. त्यांनीं त्यांत असें प्रतिपादिलें आहे कीं, " मनुष्यप्राणी या भौतिक विश्वांत वावरत असतांना जें जें वर्तन करतो त्या त्या सर्व वर्तनाच्या पाठीशीं प्रेरक व मार्गदर्शक काय असतें ? विश्वाबद्दलचें त्यानें निर्मिलेलें मानसिक चित्र ! आपआपल्या मानसिक विश्वाच्या अनुसारेंच मानवी वर्तन घडत असतें. प्राचीन व मध्ययुगीन मानवाचें विश्वविषयक चित्र धर्मग्रंथांनीं व प्रचलित लोककथांनी निर्मिलेलें होतें. आधुनिक युगांतील मानवाचें विश्वविषयक मानसचित्र विज्ञानानें व तर्कशास्त्रानें निर्मिलेलें आहे. तसाच कम्यूनिझम हा ध्येयवाद होय. तो विज्ञानपूजक आहे. परंतु कम्युनिझमच्या विचारसरणींत व अंमलबजावणींत विज्ञानविरोधी व तर्कदुष्ट असे पुष्कळ मुद्दे शिरलेले असतात. कम्युनिझमचा यशस्वी प्रतिकार करण्याचा सर्वश्रेष्ठ उपाय एकच आहे. तो म्हणजे, कम्युनिझमनें निर्मिलेलें विश्वाचें मानसचित्र विज्ञानाला व तर्कशास्त्राला विरोधी कसें आहे, हें दाखवितां आलें पाहिजे; व तें तसें दाखवितां येणें फारसें कठीण नाहीं. कम्युनिझमनें निर्मिलेलें विश्वाचें मानसिक चित्र ढांसळून टाकणें, हेंच एक कम्युनिझमच्या प्रतिकाराचें सर्वोत्कृष्ट अस्त्र होय. " प्रा. ताकेयामा यांनीं परिषदेंत मौनच पतकरलें होतें. कारण त्यांना इंग्लिश बोलणें जमत नव्हतें. परंतु त्यांच्या निबंधाची छाप फारच चांगली पडली.

परिषदेच्या प्रतिनिधींना इरावतीनदीच्या परिसरांतलें ब्रह्मदेश हें राष्ट्र भौतिक वैभवानें संपन्न होईल अशी आशा त्या महानदीच्या अपार जलवैभवानें व भूमीच्या सुपीकतेमुळें जशी उत्पन्न केली, तशीच तेथें सादर केलेल्या निबंधांच्या विचारसंपत्तीनें आशियांतील विद्यमान संस्कृतींना मोठें भवितव्य आहे, अशी आशा उत्पन्न केली. आम्ही आशियांतील सर्व प्रतिनिधी मोठ्या उत्साहानें आकाशमार्गें जमलों व विशाल विचारांचा प्रकाश घेऊन आकाशमार्गें परतलों.

---

## समाजवादी अर्थव्यवस्थेच्या कसोट्या

अमकी अर्थव्यवस्था समाजाला उपकारक आहे का, याच्या ज्या चार कसोट्या बर्ट्रंड रसेल यांनीं ( आपल्या ' प्रिन्सिपल्स ऑफ सोशल रिकन्स्ट्रक्शन ' या ४० वर्षांपूर्वी लिहिलेल्या ग्रंथांत ) सांगितल्या आहेत त्या अशाः अर्थव्यवस्थेंत ( १ ) जास्तींत जास्त उत्पादन होऊं शकतें का ? ( २ ) संपत्तीची वांटणी न्याय्य होते का ? ( ३ ) उत्पादकाचें जीवनमान बरें आहे का ? ( ४ ) जास्तींत जास्ती स्वातंत्र्य आणि प्रगतिमान् व जोमदार जीवनाला प्रोत्साहन मिळतें का ?

— वैकुंठभाई मेहता, 'हरिजन' ( २६।२।५५ ).








तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# ब्र. केवलानंदसरस्वती यांचें आत्मनिष्ठ व्यक्तिमत्त्व

दिल्लीस मराठी साहित्य-संमेलनाच्या अधिवेशनास उपस्थित राहावें म्हणून गु. स्वामींना प्रार्थना करण्याकरतां मी त्यांच्या मठांत गेलों; प्रथम साष्टांग प्रणाम केला. कोणत्याहि दिवशीं जेव्हां गुरूंचें प्रथम दर्शन घ्यावयाचें तेव्हां प्रथम साष्टांग प्रणाम करावा, अशी पूर्वापार चाल आहे. प्रणाम केल्यावर मी गुरुवर्यांना विचारलें, "आपण दिल्लीस यावें, अशी स्वागताध्यक्षांची व माझीहि इच्छा आहे; तेथेंच जवळ कुरुक्षेत्र आहे; आपण नंतर कुरुक्षेत्रासहि जाऊं." स्वामींनीं उत्तर दिलें – "आम्ही जेथें आहों तेथेंच कुरुक्षेत्र आहे ! व काशी आहे !". माझा धार्मिक उद्देश नसून व्यावहारिक उद्देश आहे, हें लक्षांत घेऊन ते लगेच पुनः पुढें म्हणाले – "माझें वय झालें आहे; आतां प्रवास सोसणार नाहीं." मी जरा अधिक आग्रह केला. मी म्हटलें कीं, "प्रवासांत दगदग पडणार नाहीं अशी सर्व प्रकारची काळजी आम्ही घेऊं. साहित्य-संमेलन दिल्लीस असल्यामुळें मराठी साहित्याची नाणावलेली मंडळी मोठ्या संख्येनें जमतील. त्यामुळें चर्चाहि चांगल्या रंगतील." अपरिग्रह-वृत्ति स्वभावतःच बाणल्यामुळें स्वामींचा स्वभाव संकोची बनला होता. दुपारच्या बारा वाजेच्या भिक्षेशिवाय त्यांनीं कोणापाशीं कधींहि कांहींहि मागितलें नाहीं. कोणी कांहीं देऊं केल्यास प्रथम नकार द्यावयाचा; आग्रह दिसल्यास होकार द्यावयाचा. या स्वभावाप्रमाणें त्यांनीं दिल्लीस येण्याचें मान्य केलें. दिल्लीच्या प्रवासांत त्यांची प्रकृति अधिक सुधारली. आम्ही हरिद्वार व हृषीकेश येथेंहि संमेलनानतर गेलों. हृषीकेशच्या गंगेच्या धावत्या प्रवाहांत स्वामींनीं नुसती लंगोटी नेसून दडवत आडवें होऊन प्रसन्न मनानें 'हर गंगे !' म्हणून त्रिवार मज्जन-उन्मज्जनहि केलें. लक्ष्मणझूला येथें जाऊन गंगेचें दर्शन घेतलें. यावेळीं त्यांच्यांत अपरिमित उत्साह भरलेला दिसला. बसल्या ठिकाणींच सर्व तीर्थें संगम पावलीं आहेत असें अनुभवणाऱ्या या ब्रह्मनिष्ठ पुरुषाला हिमालयांत गंगेचें चर्मचक्षूंनें दर्शन झाल्यानंतर त्या प्रवाहांत ब्रह्मदर्शनहि घडलें. साधना व सिद्धि या दोन्ही एकाच क्षणीं जीवन असेपर्यंत चालतात, किंवा चालाव्या लागतात. सिद्धीनंतरहि साधन सुटूं देऊं नये, असें जें समर्थ रामदासांनीं सांगितलें आहे; त्याप्रमाणें वर्तन स्वामींचें चाललें होतें.

## 'एकान्ती' जीवन

वयाच्या बावीसाव्या वर्षींच स्वामींना स्वतःच्या गुरूंकडून अनुग्रह प्राप्त झाला होता. त्यामुळें त्यांनीं ऐकान्तिक नैष्ठिक ब्रह्मचर्याची जी दीक्षा घेतली तीच अखेर परमगति प्राप्त होईपर्यंत स्थिरावत गेली व दृढमूल झाली. ब्रह्मनिष्ठ मुनि हा आदर्श त्यांनीं आपल्या जीवनाचा ठरविला होता. महान् शिल्पकाराप्रमाणें दीर्घ प्रयासांनीं तो आदर्श स्वतःच्याच हातांनीं त्यांनीं आत्मरूपांत घडविला. शिल्पकार चुकतो व चुका दुरुस्त करीत जातो त्याप्रमाणें विवेकानें व विचारानें अनेक प्रमादाचे प्रसंग टाळीत, हळूंहळूं महान् प्रयत्नांनीं त्यांची शुद्ध निर्वैर वृत्ति स्थिरावली आणि जीवनयज्ञास सांगता यावी म्हणून प्राणिमात्रांना अभयदक्षिणा देऊन ते पूर्णतेस पोंचले. म्हणूनच "जीवन सर्वतीर्थांचें संगम-स्थान झालें आहे" असा त्यांना अनुभव येऊं शकला. त्यांनीं नम्रतेनें अहंतेचें विसर्जन केलें; अपरिग्रहानें ममतेचा त्याग केला.

'एकान्तिनो हि पुरुषा दुर्लभा बहवो नृप।'

असें महाभारतांत नारायणीयधर्मांत म्हटलें आहे. नैष्ठिक ब्रह्मचर्य हाच एकान्तीपणा होय. अशीं एकान्ती माणसें जगांत फार थोडीं असतात, असें व्यासाचें व नारदाचें म्हणणें आहे. अशा प्रकारच्या दुर्लभ एकान्ती व्यक्तींपैकीं स्वामी हे एक होत. त्यांना एकान्त खूप मानवला होता कारण ते आत्मनिष्ठ होते. एकान्त मानवणें फार कठीण असतें. पुष्कळशीं एकान्ती माणसें मनोव्याधींनीं ग्रस्त झालेलीं असतात. विषय, इंद्रियें आणि मन यांच्यावर विजय मिळविण्याकरितां हीं माणसें निघालेलीं असतात. कांहीं एका प्रमाणांत विजय मिळाला कीं त्यांना विजयाची धुंदी चढूं लागते. परमार्थाच्या शिखरावर बसलेल्या या माणसांना बाकीचीं माणसें लहान दिसूं लागतात. त्यामुळें नव्या प्रकारची अहंता उद्भवते. पारमार्थिक विजयसुद्धां टिकाऊ नसतात. वस्तऱ्याच्या धारेप्रमाणें परमार्थाचा मार्ग दुर्गम असतो. जीवनाच्या अखेरच्या क्षणापर्यंत लढा द्यावा लागतो, पूर्ण अन्तर्मुख वृत्ति बाणावी लागते, आणि प्रत्येक क्षणीं बंदोबस्त ठेवावा लागतो.

शुद्ध व सामर्थ्यशाली मनाच्या एकान्ती पुरुषांना आपल्या एकटेपणांतच आत्मनिष्ठा असेल तर पूर्णतेचा मार्ग सांपडतो. परंतु मानवी निसर्गाप्रमाणें एकटी व्यक्ति पुष्कळ वेळां एकलकोंडेपणानें जर्जर होते. एकटेपणानें दुर्मुखलेले, तुसडे किंवा हेकट वैरागी तयार होतात. ते व्यथित मनाचे बनतात; ते स्वातंत्र्य गमावतात, पराश्रित बनून स्वातंत्र्याचें भय त्यांना वाटूं लागतें.

## निरामय समग्र व्यक्तिमत्त्व

स्वामींच्या ठिकाणीं एकान्तवृत्तीचे परिणाम आत्मनिष्ठेमुळें मंगल व शुभच झाले. त्यांच्यांत निरोगिता, तेजस्विता व चित्ताची प्रसन्नता चिरकाल निरंतर झळकत होती. जन्मतःच पिंड सत्त्वस्थ होता; भरदार, कोमल, रेखीव व सशक्त अशी तनू होती; चित्त मधुर व कोमल होतें. कोप जमदग्नीसारखा जरी होता तरी तो क्षणभंगुर होता. वादळानंतरची शांतता ! शांति हा त्यांच्या चित्ताचा स्वभावधर्म होता. एकान्ताची आवड होती व त्याच एकान्तानें निर्विकल्पक समाधि गांठली होती.

तरी गृहस्थाश्रमी व सुखी स्त्री-पुरुषांच्या संसाराबद्दल त्यांना फार आस्था होती. शेकडों विद्यार्थी त्यांचेपाशीं शिकून गृहस्थाश्रमी झाले. त्या विद्यार्थ्यांच्या संसारी गृहिणींना नेटका, शिस्तीचा व टापटिपीचा प्रपंच कसा करावा, या संबंधाचें सुंदर वळण त्यांच्या वर्तनावरून लागे. त्यांची बारीकसारीक व्यवहारावरहि सूक्ष्म नजर असे. गरीब, मध्यम वा श्रीमंत यांची गृहव्यवस्था निर्दोष कशी असावी, मुलांना वळण कसें लावावें, याबद्दल त्यांच्या डोळ्यासमोर विचार करून ठरवलेलें चित्र असे. चारी पुरुषार्थांचें त्यांनीं मनन केलें होतें. व्यास, वाल्मीकि, भास, कालिदास, भवभूति, भारवि, बाण, श्रीहर्ष, जगन्नाथ इत्यादि संस्कृत कवींच्या काव्योदधीचें त्यांनीं दीर्घकाल पूर्ण अवगाहन केलें होतें व दोहनहि केलें होतें. शिकवीत असतांना विद्यार्थ्यांना कालिदास, श्रीहर्ष, भारवि यांच्या दीर्घ वृत्ताच्या श्लोकांचा अन्वय जर नीट लागला नाहीं तर गुरुवर्य स्वतः अन्वय दाखवून देण्याच्या अगोदर तो दीर्घ वृत्तांताला श्लोक डौलदार रीतीनें म्हणून दाखवीत. त्या श्लोकांतील रस व अभिप्राय नुसत्या सुरेल व तालबद्ध पठनांतच व्यक्त व्हावा, अशा रीतीनें म्हणून दाखवीत. अनेक वेळां विद्यार्थ्यांचा असा अनुभव आहे कीं, गुरूंच्या मुखांतून श्रवण केल्याबरोबर न लागलेल्या श्लोकाचा उलगडा होई. गुरुवर्य सर्व रसांचा उलगडा करून दाखवीत. मात्र उत्तान शृंगार पूर्ण वर्ज्य होता. इतर सर्व रस शांतरसाचे अंकित व अंगभूत रहावे याच दृष्टीनें ते शिकवीत.

या सर्व गोष्टींचा अर्थ असा कीं, यावज्जीव निवृत्तीचें ध्येय व संन्यासाचा आदर्श स्वामींनीं राखला होता व आचरला होता, तरी त्याचें मानसिक विकृतीच्या लक्षणांत कधींहि रूपांतर झालें नाहीं. अनेक निवृत्तिमार्गी साधु, सत किंवा सन्यासी यांच्या ठिकाणीं एकान्त वृत्तीमुळें एक प्रकारची मनोविकृति निर्माण होते. तशा प्रकारची विकृति यत्किंचितहि स्वामींच्या ठिकाणीं निर्माण झाली नाहीं. याचें कारण, समाधानी स्वभाव व षट्शास्त्रांच्या परिशीलनानें उजळलेली विशाल प्रज्ञा हें होय. त्यामुळें साधुसंतांच्या ठिकाणीं बहुशः आढळणारें संमिश्र व्यक्तिमत्त्व (complex personality) स्वामींच्या ठिकाणीं नव्हतें; त्यांच्यांत अत्यंत दुर्लभ असें समग्र व्यक्तिमत्त्व (integrated personality) होतें. स्वतःच्या हातून दोष व चुका चार साध्या माणसांप्रमाणेंच होऊं शकतात अशी नेहमींच भावना त्यांच्यांत असल्यामुळें प्रत्येक महत्त्वाची गोष्ट चारचौघांना विचारून व सल्लामसलत करूनच करावयाची, असें त्यांचें धोरण असे. स्वतःच्या पारमार्थिक प्रवृत्तीचें कोणत्याहि प्रकारचें प्रदर्शन करणें त्यांना आवडत नसे. ईश्वराचा संदर्भ वारंवार आणून व्यवहाराच्या गोष्टींची चर्चा अथवा निर्णय करण्याची खोड परमार्थी माणसांना जडलेली असते. असा ईश्वराच्या भक्तीचा सवंग उपयोग त्यांनी कधींहि केला नाहीं. मधुपानांत निमग्न असलेल्या कमलकोशांतील भृंगाप्रमाणें त्यांची ईश्वरभक्ति मौनांत व्यक्त होत असे. ईश्वराचें निरंतर साक्षित्व त्यांच्या शुद्ध वर्तनानेंच व्यक्त होत होतें.

संन्यासनिष्ठा आणि कर्मयोग यांच्यांत त्यांच्या दृष्टीनें विरोध नव्हता. शांकरमत व टिळकांचा कर्मयोग यांच्यांत विरोध आहे असें ते मानीत नव्हते. गीतारहस्यास त्यांचा प्रथमपासून पाठिंबा होता. पूर्वमीमांसेचें, यज्ञसंस्थेचें किंवा वैदिक कर्मकांडाचें अधिक व्यापक व खोल परिशीलन त्यांनीं संन्यासदीक्षा घेतल्या-

नंतरच केलें. हिंदुधर्मसंस्थेचें तपशीलवार आधुनिक स्वरूप कसें असावें, याची मांडणी त्यांनीं 'धर्मनिर्णय-मंडळा'करितां संन्यासाश्रमांतच केली. शास्त्रीपंडितांनीं आधुनिक परिस्थितीप्रमाणें समाजाला मार्गदर्शन करावें, या गोष्टीचा पुरस्कार प्रामुख्यानें त्यांनीं संन्यासी अवस्थेंतच केला. स्वदेशी व्रताचें परिपालन त्यांनीं यावज्जीव केलें. ते वस्त्रस्वावलंबनी होते. विश्रांतीच्या वेळीं प्रतिदिन नियमानें ते सूत कातीत. वृद्धपणीं शीतबाधा अधिक होते, वस्त्रें अधिक लागतात तरी त्यांचीं सगळीं भगवीं वस्त्रें हातकताईचीं व हातमागाचींच होतीं.

आत्मनिष्ठ मनुष्यास एकान्त हा साधनीभूत होतो. आत्मविकासाकडे व पूर्णतेकडे त्याच्या जीवनाचा ओढा कायम राहातो. संकटांतून तो निर्भयपणें निभावून जाऊं शकतो. आपत्तीमध्यें तो खचत नाहीं किंवा त्याच्या जीवनशक्ती क्षीण पावत नाहींत. अशा वेळीं त्याची आत्मनिष्ठा कसाला लागते. एवढेंच नव्हे तर आपत्तीशीं संग्राम करतांना दोष व वैगुण्यें झडून जातात. ऐहिक किंवा भौतिक दृष्टीनें पाहिलें तर स्वामीजींना कधींहि कोणाचेंहि साहाय्य मिळालें नाहीं. धनिक लोक, बडे अधिकारी किंवा संपन्न संस्था असें कोणाचेंहि साहाय्य त्यांना प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष कधींहि नव्हतें. अशा स्थितींतहि असहायतेची यत्किंचित्‌हि जाणीव न होतां त्यांनीं आपलें दीर्घ जीवन मोठ्या आनंदांत वैभवशाली व भाग्यवान् अशा मनुष्यापेक्षांहि अधिक समाधानानें, व्यतीत केलें. या समाधानांत एका महत्त्वाच्या कारणाची भर पडली होती. तें म्हणजे वेद व शास्त्रें यांच्या व्यासंगी मनुष्याची महती स्वयंसिद्धच असते, अशी सामाजिक मान्यता आतांपर्यंत भारतांत टिकून राहिलेली होती. ती त्यांनीं अनुभवली. आणखी असें कीं, परमार्थसाधना व विद्याव्यासंग असा सुंदर संगम स्वामींनीं साधल्यामुळें अनंत समाधानांत त्यांचें मन निमग्न राहिलें. चित्त नम्र, बुद्धि अचल व वृत्ति धीर यामुळें व्यक्तित्व अत्यंत उंचावलें. यापेक्षां अधिक माणसास काय पाहिजे, अशी कृतकृत्यता लाभली. पांडित्य व साधुत्व यांच्या लाभापेक्षां महान् लाभ तो कोणता असणार !

अशा व्यक्ती केंद्रस्थानीं राहून संस्था उत्पन्न होऊं शकतात व मोठमोठीं समाजोपकारक कामेंहि पार पाडलीं जातात. स्वामींनीं पाठशाळा स्थापन करून २२ वर्षें चालविली. पाठशाळेपेक्षां त्यांचें व्यक्तित्व कांहीं निराळें होतें. कार्यावरून अशा व्यक्तीचा महिमा अजमावतां येत नाहीं. कित्येक वेळां कार्यें विशाल व गुणसंपन्न असतात; परंतु कार्य करणाऱ्या व्यक्तींचीं व्यक्तित्वें त्या मानानें सामान्य असतात. स्वामींनीं प्राचीन विद्यांच्या अनेक शाखांचा दीर्घकाल व्यासंग केला. प्रचंड ग्रंथरचनाहि केली. परंतु केवळ विद्याव्यासंगांत रत व समाजापासून अलग असलेले महापंडित ते नव्हते, समाजांतील चालूं घडामोडी व त्यापासून उत्पन्न होणारें हिताहिताचे प्रश्न याबद्दलहि ते अत्यंत जागृत होते. गेल्या पन्नास वर्षांतील राजकीय व सामाजिक चळवळींविषयीं त्यांनीं आपलें अनुसंधान कायम ठेवलें. त्यांच्या आशीर्वादामुळें त्यांच्या अनेक शिष्यांनीं राजकीय संग्रामांत अनेक वेळां भाग घेतला व धार्मिक व राजकीय सुधारणांना पाठिंबा दिला, शास्त्री, पंडित व विद्वान् यांच्या परंपरेला त्यांनी नवेंच वळण लावलें. डोळ्यासमोर घडणारा सामाजिक इतिहास उपेक्षून चालणार नाहीं, त्याबद्दल तटस्थ राहाणें बरें नव्हे – ही गोष्ट, संन्यस्त व अन्तर्मुख वृत्तीच्या स्वामींनीं निक्षून सांगितली. यापासून विश्वविद्यालयीन नव शिक्षितांनीं सुद्धां बोध घेण्याची खरोखरच आवश्यकता आहे.

स्वामीजींच्या बुद्धीला अंध श्रद्धेचें जाड्य कधीं आलें नाहीं. मंत्रतंत्र यांचें त्यांनीं खोटें समर्थन कधीं केलें नाहीं. त्यांच्या अखेरच्या आजाराच्या वेळीं गेल्या महिन्यांत 'नवभारत' मासिकाचे एक संपादक श्री. ह. कृ. मोहनी यांनी स्वामींना प्रश्न विचारला कीं, "आपलें मंत्रसामर्थ्याबद्दल काय मत आहे व काय अनुभव आहे ?" स्वामींनीं उत्तर दिलें कीं, मी "आयुष्यभर निदान पांच तपें तरी, मंत्रजप केलेला आहे. चित्तशुद्धि हाच माझ्या मंत्रजपाचा हेतु होता. मनुष्य जितका निष्पाप राहूं शकतो तितका निष्पाप मी राहिला आहे. एवढेंच नव्हे, तर धर्मशास्त्रोक्त पद्धतीनें आचारधर्माचें संपूर्ण परिपालन केलें आहे. मला मात्र मंत्रसामर्थ्याच्या चमत्काराचा कधींहि अनुभव आला नाहीं. निसर्गाचे नियम मंत्रसामर्थ्यानें बदलूं शकतील असें मला वाटत नाहीं."

## आत्मतृप्त मानवाचे अखेरचे दिवस

कफविकार उद्‌भवून स्वामींना १६ डिसेंबर १९५४ ला खूप ज्वर आला. हा ज्वर अल्पप्रमाणांत अगोदरहि ४।५ दिवस होताच. आजाराकडे दुर्लक्ष करण्याची त्यांची प्रवृत्ति होती. ज्वर असतांच ते पुणें येथें १४ व १५ डिसेंबरच्या कार्यक्रमाला उपस्थित राहिले या प्रवासाची दगदग त्यांना बाधली व ज्वर वाढला; ब्रँको-न्युमोनिया झाला. त्यांत प्रथम ३।४ दिवस औषधपाण्याची त्यांनीं हयगय केली. मी १७ डिसेंबरला बाहेरगांवाहून वाईस आलों व लगेच आजाराची वार्ता कानीं पडल्याबरोबर स्वामींची भेट घेतली. मी फारच खिन्न झालों. परततांना त्यांच्या माडीच्या जिन्यांत विषण्णपणें थांबलों. हें त्यांच्या लक्षांत आलें. त्यांनीं जवळ असलेल्या उपचार करणाऱ्या शिष्याला सांगितलें कीं, आमची " ' ॐ तत् सत् ' ची वेळ जवळ आली आहे. लक्ष्मण जिन्यांत थांबलेला दिसतो. त्याला परत बोलवा. " मी पुनः त्यांच्यापाशीं जाऊन बसलों. ते किंचित् उठून बसले. प्रेमळपणें माझें हस्तांदोलन करून थोडावेळ गंभीरपणें त्यांनीं ईश्वरचिंतन केलें. नंतर मला रजा दिली.

७।८ दिवसांतच आजारानें त्यांचें हृदय दुर्बल झालें व हृदयदौर्बल्याचा विकार वाढला. उपचाराची अधिक चांगली व्यवस्था व्हावी म्हणून मठांतून स्वामींना धर्मकोशकार्यालयाच्या दुसऱ्या मजल्यावर आणलें. ते १२ दिवस पर्यंत आडवे होऊन मुळींच झोंपले नाहींत; बसून होते. आयुर्वेदिक उपचार थोडासा घेत होते. डॉ. खरे, डॉ. दातार व मुंबईचे डॉ. य. वि. पुरंदरे यांची निरंतर देखरेख सुरू झाली डॉ. दातार व पुरंदरे यांच्या मतें स्वामींनीं ॲलोपॅथीचे उपचार घ्यावे, असें शाही मी धीर करून जानेवारी ३ तारखेस पहांटे करीतमींनीं नवी औषधयोजना मान्य करावी," अशी "। केली. स्वामींनीं मला सांगितलें कीं " हें शरीर हाणेंरांतून बरें झालं तरी कार्यक्षम राहणार नाहीं; जाणां हें जाऊं दे. " मी यावर मोठा धीर करून त्यांना सांगितलें कीं, " प्रत्येक श्वास व जागृतीचा क्षण मोठ्या मोलाचा असतो. येथील जीवन हेंच अंतिम मूल्य आहे. विशेषतः आपली जागृति ईश्वरचिंतनानें भरलेली; आपले श्वास आत्मसाक्षात्काराचे; त्यांचें मोल वर्णनापलीकडे आहे ! " स्वामींनीं यावरून ओळखलें कीं, " कार्यक्षम न राहिलेलें माझें शरीरहि यांना पाहिजे आहे; यांची इच्छा पुरी होऊं द्यावी. " स्वामींनीं नवी औषधयोजना मान्य केली.

स्वामींना म्हातारपणचा मूत्रकृच्छ्राचा विकार गेलीं दोन वर्षे होता. तो त्यांनीं कोणास कळूंच दिला नाहीं. कसलेहि कठोर कायक्लेश व देहयातना त्यांच्या खिजगणतींत नव्हत्या. सहा फूट उंचीचा भरदार देह, परंतु अखेरच्या आजारांत कफ, खोकला, मूत्रकृच्छ्र व धाप यांच्या यातना उद्‌भवल्या. शंकराच्या देहावर विषारी नागांचे विळखे असतात तरी त्याची योगसमाधि जशी निरंतर अभग्न राहाते, त्याचप्रमाणें शरीरव्याधींच्या व्यालांचे विळखे पडले होते तरी स्वामींचें तत्त्वानुसंधान सतत चालूंच होतें. १२ दिवस प्रथम सतत बसून काढले. परंतु केव्हांहि कण्हले नाहींत, केव्हांहि चेहऱ्यावरची प्रसन्नतेची छाप ढळली नाहीं. डोळे खोल गेले तरी दृष्टींतील समाधान स्थिरच होतें. बोलण्यांत गोडवा कायम राहिला, स्मृति तल्लख होती, विचारांत स्वच्छता व संगति होती. शांति, संयम व आनंदी वृत्ति पाहून डॉक्टरमंडळी चकित झाली. नवी ॲलोपॅथीची औषधयोजना म्हणजे इंजेक्शनें. पूर्वी इंजेक्शनें कधींच घेतलीं नव्हतीं; त्यामुळें प्रकृति २।३ दिवसांत सुधारण्याच्या मार्गास लागली. १५ दिवसांत चांगलाच फरक पडला कफ, खोकला, मूत्रकृच्छ्र व धाप इत्यादी दोष नष्ट झाले जानेवारीच्या उत्तरार्धांत स्वामी अर्धा तास माडींतल्या माडींत फेऱ्या घालूं लागले. ३ तास मीमांसाकोशाचें संपादकीय कार्य पाहूं लागले. एक दिवशीं कोठा स्वच्छ नसावा, अशी त्यांना शंका आली आणि त्यांनीं एनिमा घेतला. मला ही गोष्ट कळल्याबरोबर मी लगबगीनें स्वामींकडे गेलों आणि सांगितलें कीं, " एनिमा घेतला नसता तर बरें झालें असतें. एरंडेल घेतलें नाहीं हें तर फारच चांगलें झालें. नाहीं तर तत्क्षणीं समाधि ! " हे माझे किंचित् चिडीचे उद्‌गार ऐकून स्वामींना उपहासगर्भ हसूं आलें. थट्टा व उपहास अशी छटा चेहऱ्यावर होती. त्यांच्या मनांत असें आलें कीं " वा ! समाधीचा उत्कृष्टच उपाय तर्कतीर्थांना सांपडला ! योगसूत्राला पुस्ती जोडली पाहिजे. " रात्रीं नेहमीप्रमाणें मंडळी जमली तेव्हां त्यांनीं हा तर्कतीर्थांचा शोध सूत्ररूपानें बोलून दाखविलाः " एरंडविरेचनात् समाधिः असमर्थहृदयस्य इति तर्कतीर्थः "










स्वामींना हें मागाहून पटलें. कारण त्यांना त्यानंतर खूप अशक्तपणा आला, तो पुनः निघालाच नाहीं. यानंतर देहदुःखव्यथा मात्र कसलीहि राहिली नाहीं. शेवटपर्यंत आनंदच आनंद !

अखेरचे दिवस थोडे राहिले, असें स्वामींना एक महिना अगोदर पुनः दिसलें. शाण्डिल्याची आत्मविद्या ( छांदोग्योपनिषद् ३।१४ ) हाच त्यांचा अनेक वर्षें अजपाजप होता. त्यांच्या गुरुसंप्रदायाप्रमाणें त्यांत कांहीं विशेष भर व काटछाट केलेली होती. आपल्या निर्वाणसमयीं ही शांडिल्यविद्या शिष्यानें २८ वेळां जपावी म्हणून त्यांनीं संप्रदायपद्धतीनें एका कागदावर टिपून ठेवली, व उलट असेंहि सांगितलें कीं "कोणी नाहीं जपली तरी चालेल; कारण, आमचा जप अखंडपणें शेवटच्या क्षणापर्यंत चालूंच राहणार ! "

मी फेब्रुवारी १२ तारखेस ब्रह्मदेशाला जाण्यास निघालों. स्वामींची मुद्दाम अनुज्ञा घेतली. माझा अनुज्ञा घेण्याचा हेतु त्यांच्या लक्षांत आला. माझा हेतु होता कीं, ब्रह्मदेशाहून २५ तारखेपर्यंत परतेन, परतल्यावर भेट व्हावी. १४ तारखेस स्वामींची प्रकृति खूप बिघडली. परंतु त्यांनीं इतरांना बजावलें कीं, "लक्ष्मणला माझी प्रकृति बिघडल्याचें कळवूं नका, त्याला यात्रा पुरी करूं द्या."

दोन दिवसांत प्रकृति पुनः पूर्वपदावर आली. पण अखेर आजार उलटला. २६ व २७ तारखांना हृदयव्यथेचे जोराचे हल्ले झाले. स्वामींनीं दोनदां ते तसेंच सोसले. कोणासहि सांगितलें नाहीं. अखेरचा हल्ला आला, तेव्हां डॉक्टर जवळ होते. त्यामुळें डॉक्टरांना कळलें. तरी स्वामींची प्रसन्नता मात्र अढळ होती; मन अगदीं मोकळें होतें. त्यामुळें इतरांना स्वामींचा अंतकाळ जवळ आला आहे हें नीट लक्षांत आलें नाहीं. मी फेब्रुवारी ता. २८ ला संध्याकाळीं आठच्या सुमारास ब्रह्मदेशाहून परत आलों. स्वामीजी दोन दिवस वाट पहात आहेत, असें घरातल्या मंडळींनीं सांगितलें. मी तडक स्वामींच्या बिछान्यापाशीं गेलों.

स्वामी ध्यानस्थ सिद्धासनावर बसले होते. प्रणाम करून, मोठ्यानें "प्रकृति कशी आहे ?" असें मी विचारलें. मी आलों, हें त्यांच्या ध्यानांत आलें, व हंसतमुद्रेनें प्रणामाचा स्वीकार करून हस्तांदोलन करून त्यांनीं जवळ बसवून घेतलें. अखेरचा निरोप घेतला; "पूर्ण समाधान आहे, कसलीहि उणीव नाहीं," असें मला सांगितलें.

अलीकडे ९ ते ११ या दरम्यान रात्रीं शिष्य व मित्रमंडळी, स्त्रीपुरुष स्वामींच्या संनिध येऊन रोज बसत. त्याप्रमाणें मंडळी २८ फेब्रुवारीलाहि आली. आज कोणी येऊं नका, मी एकटाच स्वस्थ पडतों, असा स्वामींनीं आदेश दिला. रात्रीं ११ वाजतां स्वामींना थोडी भूक लागली. त्यांनीं दूधपोह मागून घेतलें खाल्लें व पुनः स्वस्थ पडले. मध्यरात्र उलटल्यावर दोन वाजून वीस मिनिटांनीं श्री. एकनाथ विश्वनाथ शुक्ल या अहोरात्र सेवा करणाऱ्या व जवळ उपस्थित असलेल्या विद्यार्थ्याजवळ ऊन पाणी मागितलें. पाणी गार झालें होतें. तें गरम होईपर्यंत खाटेवर वाट पहात बसून राहिले. गरम पाणी मिळालें. तेथेंच हत्तीसारख्या जाड्या भिंतीला पुरुषभर उंचीचा रुंद कोनाडा आहे. त्यांत भांडे ठेवलें होतें ...... देहशुद्धि केली. तेथेंच उभे राहिले; दीर्घ प्रणवोच्चार केले व परमगतीस पोंचले ! भगवद्गीतेंत म्हटलें आहे :

" ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन् मामनुस्मरन् ।
यः प्रयाति त्यजन् देहं स याति परमां गतिम् ॥ "

" ॐ हें एकाक्षर ब्रह्म उच्चारीत माझें स्मरण करीत जो देह टाकून प्रयाण करतो, तो परमगतीला प्राप्त होतो. "

हें क्षणांत घडलें, तें श्री. शुक्ल यांनीं पाहिलें व लगेंच तेथूनच खिडकींतून तोंड बाहेर काढून आम्हांस पुकारलें. श्री. भालचंद्रशास्त्री नेने तेथेंच भिंतीआड अर्धवट जागे होते; त्यांनीं प्रणव ऐकला; ते उपस्थित झाले; आम्ही सर्व मिनिटाच्या आंत स्वामींजवळ आलों. देह कोनाड्यांतच भिंतीस उभा टेकलेला, तळहात नव ज्ञानमुद्रेनें युक्त असे गुडघ्यावर टेकलेले, नेत्र [illegible] परंतु किंचित् निमीलित, ओठ प्रणवोच्चाराच्या आक[illegible], सर्व शरीर चांगलें ऊबदार, परंतु श्वास विलीन ! [illegible] शोकाकुल होऊन अगदी जवळ गेलों व आस[illegible] करण्याकरितां देह उचलण्यास सिद्ध झालों; तों आज्ञेची आठवण झाली; अत्यंत उच्च स्वरांत २८ वेळ आत्मविद्येचा मंत्र जपला; अखेरीस 'सोऽहम्' म्हणून साश्रुनयनांनीं गुरुचरणांवर मस्तक ठेवलें !



अनुक्रमणिका






# सारसंकलन

## आंतरराष्ट्रीय राजकारण

### मॅलेंकाव्हच्या राजीनाम्याचे प्रतिध्वनि

लंडनचें " इकॉनॉमिस्ट " ( १२ फेब्रुवारी १९५५ ) पत्र म्हणतें :

" अलीकडे प्रत्यक्ष रक्तपाताचें प्रमाण कमी झालेलें दिसत असलें तरी त्यावरून रशियांतील कारस्थानें व सत्ताकलह यांची तीव्रता कमी झाली आहे असें म्हणतां येत नाहीं. सोव्हिएट पंतप्रधान आणि व्यापारमंत्री राजिनामा देतात आणि किंचित् गौण स्वरूपाच्या सार्वजनिक अधिकारस्थानावर नरमपणें कायम रहातात यांवरून सोव्हिएट पद्धति सुसंस्कृत झाल्यासारखी दिसते खरी ! तथापि कम्युनिस्ट कायद्यान्वयें मिळालेली फांशीची शिक्षा 'तहकूब' होऊन पुनश्च सत्ताधीशांची मर्जी संपादन व्हावी म्हणून धडपड करण्याची संधी मिळालेल्या व्यक्तींपेक्षां त्यांची परिस्थिति कितपत निराळी आहे याविषयीं शंका आहे. आणि मॅलेंकॉव्हच्या राजीनाम्यानंतर खालच्या पातळीवर महत्त्वाचे फेरबदल न झाल्यास तें एक आश्चर्यच म्हणावें लागेल.

" हा विजय केवळ क्रुश्चेवच्या वैयक्तिक अनुयायांचाच विजय नसून सर्व पक्षनेत्यांचा तो विजय आहे. त्यांच्या समजुतीप्रमाणें मॅलेंकॉव्ह हा त्यांच्या स्वाभाविक विरोधकांचा म्हणजे तंत्रविद्याकुशल कारागीर, कारखान्यांचे मॅनेजर आणि सरकारी अधिकारी यांचा प्रवक्ता होता. कार्यक्षमतेकडे त्याचे विशेष लक्ष होतें. आणि व्यवस्थापकवर्गा- (Managerial class)ला व नोकरशाहीला तो पक्षांतील कार्यकर्त्यांच्या वर्चस्वापासून मुक्त करूं पहात होता. आतां स्टालिनच्या परंपरेनें वर्चस्व स्थापन झालें असून नोकरशाहीला पुनः खडतर कामाला जुंपण्याचें कार्य क्रुश्चेव्ह करीत आहे.

" पक्षाला या बाबतींत सैन्यावर बरेंच अवलंबून रहाणें भाग आहे आणि या भागीदारीचें बुल्गॅनिन हें साधन असून झुकॉव्ह हें प्रतीक होय. तथापि तूर्त तरी सैन्याची ' निद्रित ' भागीदार होण्याची तयारी दिसते. त्याप्रमाणें एकेकाळीं सामर्थ्यवान् असलेलें (गुप्त) पोलिसदल या सत्ताकलहांत फारसें कोठेंहि दिसत नाहीं. यामुळें स्टालिनवादी विचारसरणीच्या कर्मठ पक्षनेत्यांना आपलें वर्चस्व प्रस्थापित करण्याला ही संधी आहे.

" सोव्हिएट युनियनमधील जनतेच्या दृष्टीनें मात्र ही घटना फारशी समाधानकारक नव्हे. आर्थिक जीवन आणि राजकीय व मानसिक वातावरण या दोन्ही दृष्टींनीं त्यांच्या पदरीं निराशाच येणारसें दिसतें. सुप्रीम सोव्हिएटची बैठक भरण्यापूर्वीच लहान उद्योगधंद्यांविरुद्ध सुरूं झालेली वृत्तपत्रीय ओरड, पक्षाच्या मध्यवर्ती समितीपुढील क्रुश्चेव्हचें भाषण आणि मिकोयानची बडतर्फी इत्यादि घटनांमुळें १९५३ सालांत उराशीं बाळगलेल्या आशा फोल होत, याबद्दलचा इषारा जनतेस मिळाला होताच. आतां मूलोद्योगांच्या कारखान्यांना व संरक्षणाच्या उद्योगधंद्यांना वरिष्ठ स्थान देण्यांत आलें आहे; जीवनोपयोगी वस्तूंचें १९५५–५६ सालापर्यंत भरपूर उत्पादन वाढविण्याच्या अभिवचनांना हरताळ फांसण्यांत आला आहे; आणि दोन वर्षांपूर्वी होती त्याचप्रमाणें सरकारी कर्जरोख्यांच्या द्वारा जनतेला जबरदस्तीनें बचत करण्यास लावण्यांत येणार आहे....

" मॅलेंकॉव्ह आणि मिकोयान यांची पदच्युति आशिया आणि आफ्रिका यांच्या दृष्टीनें सूचक स्वरुपाची आहे. या दृष्टीनें गेल्या काहीं महिन्यांतील रशियांतील घटनांचा काळजीपूर्वक विचार केल्यास कम्युनिस्ट व्यवहारांत जनतेचें कल्याण मूठभर अधिकारारूढ व्यक्तींच्या लहरी आणि आसवाक्यांतून उद्भवणारे निर्णय यावर कसें अवलंबून असतें हें दिसून येईल. "

याच विषयावर ' स्पेक्टेटर ' ( ११ फेब्रुवारी १९५५ ) हें दुसरें साप्ताहिक लिहितें :

" मार्च १९५३ मध्यें जेव्हां मॅलेंकॉव्ह आणि बेरिया अधिकारारूढ झाले तेव्हां पक्ष आणि गुप्त पोलिस हीं दोन सत्ताकलहांतील सामर्थ्यवान् साधनें त्यांच्या हातांत होतीं तथापि एका महिन्याच्या आंतच स्थानिक कार्याचा अनुभव नसल्याच्या सबबीवर मॅलेंकॉव्हला पक्षाचें चिटणीसपद क्रुश्चेव्हला देणें भाग पडलें. त्यामुळें त्याचीं अनेक माणसं वरिष्ठ स्थानावर असून देखील त्याचें स्थान दुर्बल झालें. त्यामुळें जूनमध्यें त्याला एका विरोधकाचा–बेरियाचा–निःपात उडवण्यासाठीं दुसऱ्याशीं –क्रुश्चेव्हशीं हातमिळवणी करावी लागली.

" या ' नव्या एकतंत्री सामुदायिक नेतृत्वांत ' पुनः अंतर्गत संबंध ताणले जाऊं लागले. १९५४ च्या








प्रारंभीं क्रुशेव्ह वरचढ होऊं पहात होता. पण डॉक्टरांच्या कटाचा बनावटपणा दाखवून त्याचा जनक रूमिन याजवर खटला भरला गेला व त्याला शिक्षा झाली. रुमिन हा स्टालिनच्या संरक्षकदलाचा प्रमुख असून क्रुशेव्हचा हस्तक होता. यामुळें मॅलेंकॉव्हनें अत्यंत चलाखीनें क्रुशेव्हला शह दिला. तथापि गेल्या डिसेंबरमध्यें क्रुशेव्हला संधी मिळाली. १९४९ सालीं झॅडॅनोव्हच्या अनुयायांचा निःपात करण्याबद्दल जबाबदार असलेल्या ॲबाकुमॉव्हवरील खटला त्या वेळीं सुरू झाला. वरील निःपातामुळें मॅलेंकॉव्ह सत्तारूढ होणें बरेंच सुकर झालें होतें. तथापि ती घटना देखील बनावट स्वरूपाच्या पुराव्यावरच आधारलेली होती अशी कबुली ॲबाकुमॉव्ह यानें दिली.

" नुकत्याच भरलेल्या मध्यवर्ती समितीच्या बैठकींत क्रुशेव्हनें मॅलेंकॉव्हच्या धोरणावर हल्ला करतांना त्याची रायकॉव्हशीं तुलना केली. रायकॉव्हचें पुढील भवितव्य ध्यानांत घेतल्यास ही तुलना अत्यंत धोक्याची होती. पदच्युतीनंतर कांहीं वर्षांचा काळ लोटल्यावर रायकॉव्हला फांशीं देण्यांत आलें.

" मॅलेंकॉव्हला विद्युत्‌मंत्री करण्यांत आलें आहे. तथापि सार्वजनिक उपयुक्ततेच्या खात्यांबाबत रशियांत नेहमींच धोका असतो. यागोडाला गोळी घालण्यापूर्वी कांहीं काळ टपाल व तारायंत्र हें खातें देण्यांत आलें होतें. आणि तुरुंगांत मरण पावलेला येझॉव्ह हा अंतर्गत जलवाहतुकीचें खातें पहात होता. "

याच विषयासंबंधीं लिहितांना लंडनचें ' टाईम्स ' पत्र ( ता. ११ फेब्रुवारी १९५५ ) ' मॉस्कोचे आरसे ' या शीर्षकाखालीं लिहितें :

" सोव्हिएट नेतृत्वांतील बदल सगळीकडे सार्वजनिक रीत्या, शंका यावी इतक्या नम्रपणानें, समजावून सांगण्यांत येत आहे. खऱ्याखुऱ्या लोकशाही राजवटींतील अनासक्त वृत्तीच्या राज्यकर्त्यांत अधूनमधून होणाऱ्या बदलांपैकींच हाहि एक बदल होय असें म्हटलें जातें.

"उदाहरणार्थ, 'रशियाच्या राज्यघटनेस अनुसरूनच' हा बदल करण्यांत आला आहे असें ( इटलींतील कम्युनिस्ट पुढारी ) तोग्लिआती म्हणतो. या बदलामुळें मूलभूत सोव्हिएट धोरणांत बदल होणार नाहीं, असा निर्वाळा जपानमधील कम्युनिस्ट देतात. पश्चिम युरोपमधील कम्युनिस्ट वृत्तपत्रें म्हणतात कीं रशियांतील घटना गूढ वाटण्याचें खरें कारण म्हणजे भांडवलशाही देशांतील पंतप्रधानांना मॅलेंकॉव्हप्रमाणें आपली नालायकी कबूल करण्याची संवय नाहीं हेंच होय.

" निरनिराळे भांडवलशाही गट माझ्या निवेदनामुळें विविध स्वरूपांत अकांडतांडव करतील अशी अपेक्षा मॅलेंकॉव्हनें आपल्या राजीनाम्यांतच व्यक्त केली आहे. त्यामुळें सर्वत्र कम्युनिस्टांनीं अत्यंत शांतपणाची वृत्ति धारण केल्याचें दिसतें. तथापि या देखाव्यामागें थोडीशी अस्वस्थता आहेच. कारण नेतृत्वांतील बदल कोणत्याहि पूर्वसूचनेवांचून घडून आला. केवळ ' भांडवलशाही ' वृत्तपत्रेंच रशियन नेत्यांमधील मतभेदांविषयीं बोलत होतीं आणि त्याकडे दुर्लक्ष केले जात होतें. त्यांची निर्भत्सनाहि होत होती.

" या बदलामुळें केवळ घोषणाच बदलाव्या लागणार असल्या तर फारशी अडचण येणार नाहीं.

" पोलादी पडद्याबाहेर असलेल्या कम्युनिस्टांमध्यें देखील या घटनेमुळें व्यक्तींत नसला तरी धोरणांत बदल होईल अशी अपेक्षा वाटते. कांहीं नेत्यांवर मॅलेंकॉव्हच्या विचारांचा इतर कांहींच्या मानानें अधिक परिणाम झाला असणें शक्य आहे. बाहेरील स्थानें आरशासारखीं असली पाहिजेत. त्यावांचून मॉस्कोंतील राज्यकर्त्यांचें सहसा समाधान होत नाहीं ".

मॅलेंकॉव्हच्या राजीनाम्याचे रशिया आणि चीन यांच्या संबंधावर काय परिणाम होणार याविषयीं ( ता. १५ फेब्रुवारी १९५५) 'मँचेस्टर गार्डियन' म्हणतो :

" या दोन प्रमुख कम्युनिस्ट राष्ट्रांमध्यें अधिक निकटचें सहकार्य प्रस्थापित होण्याचा संभव आहे हें जरी खरें असलें तरी चीन आतां अधिकाधिक आग्रही भूमिका घेऊं लागेल मॉस्कोच्या दृष्टीनें चीन ही एक समस्या बनण्याचा संभव आहे.

" चीन हळुंहळुं जगांत सर्वांहून मोठें सैन्य उभारूं लागला म्हणजे कालांतरानें रशियाला त्याविषयीं वाटणारा विश्वास कमी होऊं लागणें शक्य आहे हें गेल्या आठवड्याच्या अखेरीस डॉ० ॲडेनॉवर यांनीं व्यक्त केलेलें मत योग्य आहे. उद्योगधंद्यांच्या अभावामुळें चीनचें हें सैन्य कांहीं काल अगदीं प्राथमिक अवस्थेंत असणार हें उघड आहे. तथापि तरी देखील त्या योगानें जागतिक राजकारणांत आपणांस नवें सामर्थ्य

प्राप्त होईल अशी आशा चिनी नेत्यांना वाटणें स्वाभाविक आहे. अर्थात् अशा प्रकारचें सैन्य अखेरीस चीनलाच त्रासदायक ठरण्याचा संभव आहे. लाखों लोकांची सेना हा आधुनिक जगांत चीनच्याच मानेभोंवतीं असणारा गळफांस ठरण्याचा संभव अधिक आहे. तथापि तूर्त जागतिक राजकारणांत महत्त्व प्राप्त करून घेणें हीच पेकिंगची महत्त्वाकांक्षा असण्याचा संभव आहे.

" चीननें याबाबत स्वतंत्र धोरण ठरविण्याला जर मॉस्कोनें आक्षेप घेतला तर चीन त्याला सहज उत्तर देऊं शकेल. २०-२२ सालापासून कोरियांतील आक्रमणापर्यंत चीनला मॉस्कोनें दिलेला सल्ला वेळोवेळीं प्रत्यक्ष अनुभवानें चुकीचा ठरला आहे. दुसऱ्या राष्ट्रांविषयीं निदान करतांना एखाद्या राज्यानें इतक्या सातत्यानें चूक केल्याचें उदाहरण दुसरें क्वचितच आढळेल. "

## रशियाच्या लष्करी खर्चांतील वाढ

रशियाच्या लष्करी खर्चांतील वाढीसंबंधीं लिहितांना ' स्पेक्टेटर ' ( ता. १५ फेब्रुवारी १९५५ ) पत्र म्हणतें :

" शस्त्रसामग्रीवरील रशियन सरकारच्या अंदाजपत्रकान्वयें १९५४ सालच्या मानानें सुमारें १/५ अधिक खर्च केला जाणार आहे, हा खरा महत्त्वाचा मुद्दा आहे. गतवर्षीचा खर्च अवाढव्य होताच हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. रशियाचें एकूण लष्करी खर्चाचें अंदाजपत्रक या वर्षी ११२·१ अब्ज रूबल्स इतकें आहे. गतवर्षी ही रक्कम १००·३ अब्ज रूबल्स-इतकी होती. अशा प्रकारें अंदाजपत्रकांतील संरक्षण-खर्चांत समारें १/८ इतकी वाढ झाली आहे.

" रशियन सैन्यबळ सुमारें ४७,५०,००० इतकें आहे. या सैन्याचा पगार, भत्ते व इतर शस्त्रसामग्री यांव्यतिरिक्त खर्च गेल्या वर्षी सुमारें ५० अब्ज रूबल्स झाला. आणि उरलेला ५० अब्ज रूबल्स खर्च हा बहुतांशीं शस्त्रसामग्रीवर करण्यांत आला.

" यंदाहि सैन्यबळ गेल्या वर्षाइतकेंच रहाणार असून त्यासाठीं खर्चहि गेल्या वर्षाइतकाच होईल. यामुळें शस्त्रसामग्रीवर सुमारें ६२ अब्ज रूबल्स म्हणजे २० टक्के अधिक खर्च केला जाईल.

" या अंदाजपत्रकांतून व्यक्त होणाऱ्या खर्चांत इतर खर्चाची भर घालणें जरूर आहे. उदाहरणार्थ, हैड्रोजन-बॉंबच्या निर्मितीसाठीं केला जाणारा अवाढव्य खर्च हा येथें विचारांत घ्यावयास पाहिजे. "

## ॲटली यांची सूचना

ब्रिटिश मजूरपुढारी ॲटली यांनीं ता० ४ मार्च १९५५ रोजीं ऑक्सफर्ड येथें केलेल्या भाषणांतील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें आहे :

" युद्ध झाल्यास ब्रिटन प्रथम हैड्रोजन बॉंबचा उपयोग करणार नाहीं हें रशियाला सांगणें निरर्थक आहे. रशियाला आपल्या मार्गापासून परावृत्त करणारीं साधनें तुम्हांस हवीं असतील तर त्यांचा उपयोग करण्याचीहि तुमची तयारी पाहिजे. दोन्ही बाजूंना थोडाफार समजूतदारपणा व व्यावहारिक शहाणपण आढळेल अशी आशा बाळगण्यास हरकत नाहीं. म्हणूनच अगदीं वरच्या श्रेणींतील नेत्यांचीं बोलणीं व्हावींत असा आमचा प्रयत्न आहे. या बोलण्यांतून कदाचित् कांहींहि निष्पन्न होणार नाहीं. तथापि प्रयत्न करून पहाणें इष्ट होय.

" जर्मनीचें लष्करी सामर्थ्य पुनः निर्माण करण्याचा विचार आपण लांबणीवर टाकला तर रशिया अधिक समजूतदारपणानें वागेल असें मला वाटत नाहीं. मोठ्या दिलानें वागल्यास रशियाकडून तशाच स्वरूपाचा प्रतिसाद मिळतो असें केव्हांहि आढळलेलें नाहीं. ते कठोर लोक आहेत. नैतिक भावना वगैरे ते जाणत नाहींत. स्वहितासाठींच त्यांचे सर्व प्रयत्न आहेत. आणि हें ओळखणें यांतच शहाणपणा आहे.

" कांहीं उच्च नीतितत्त्वांचा पाढा वाचण्यासाठीं क्रेमलिनला जाण्यांत अर्थ नाहीं. स्पष्ट व खरमरीतपणें बोलणेंच तेथें उचित होय. "

## ' जिनेव्हा करारानंतरचा इंडोचीन '

वरील शीर्षकाखालीं ' मँचेस्टर गार्डियन ' पत्राचे गाय् विंट लिहितातः

" हा करार होऊन आठ महिन्यांचा काळ लोटला आहे. या काळांत निराशाजनक असें कांहींच घडलें नाहीं असें नाहीं. तथापि एकंदरीनें पहातां चिंतेपेक्षां समाधानालाच अधिक वाव आहे.

" पुनः मोठ्या प्रमाणांत लढाई सुरू झाली नाहीं ही मुख्य गोष्ट होय. यामुळें निराशावाद्यांची भीति अस्थानीं होती, हें स्पष्ट झालें आहे. कराराप्रमाणें नेम-








ण्यांत आलेल्या आंतरराष्ट्रीय कमिशननें अनेकांच्या अपेक्षेपेक्षां कितीतरी अधिक परिणामकारक कार्य केलें आहे. यामुळें त्याचें वजनहि वाढलें आहे. दोन्ही बाजूंकडून आलेल्या तक्रारींचें निराकरण कमिशननें तांतडीनें केलें आहे.

"कमिशनपुढें आलेला एक अत्यंत कठिण प्रश्न म्हणजे एका बाजूकडून दुसऱ्या बाजूकडे जाणाऱ्या निर्वासितांचा प्रश्न होय. कम्युनिस्टांच्या ताब्यांत असलेल्या प्रदेशांतून व्हिएटनामकडे सुमारें ७ लक्ष लोक आले आहेत. या घटनेचा अर्थ कम्युनिझमच्या स्वरूपावर प्रकाश टाकणारा आहे. आंतरराष्ट्रीय कमिशननें निर्वासितांच्या प्रवाहाला नियंत्रित करण्याच्या दृष्टीनें कांहीं महत्त्वाच्या शिफारशी केल्या आहेत. याबाबत परवाने देण्याच्या दोन्ही बाजूंच्या पद्धतीवर टीका केली आहे. परवाने देण्याची पद्धत ही गुंतागुंतीची असून अनेक निर्वासितांना परवाना मागण्याची भीति वाटते असें कमिशनचें म्हणणें आहे.

"दोन्ही बाजूस परवाने देण्यासाठीं वेगळी व्यवस्था करण्यांत यावी आणि अर्ज केल्यानंतर पंधरा दिवसांच्या आंत परवाना दिला जावा. जाऊं इच्छिणारांना, कां जावयाचें आहे याबद्दल लांबलचक खुलासा विचारण्यांत येऊं नये. परवाना नाकारल्यास त्याबद्दलचीं कारणें देण्यांत यावींत आणि त्या नकाराविरुद्ध 'अपील' करण्याची सवलत असावी.

"या सुधारणा पंधरा दिवसांच्या आंत केल्या जाव्यात असें कमिशनचें म्हणणें आहे. जर तसें घडून आलें तर दोन्ही बाजूस जनतेंत विश्वास वाढीस लागेल. जिनेव्हा-करारामुळें लाखों लोकांना निर्वासित म्हणून घरादारांचा त्याग करून निघावें लागावें ही एक अत्यंत शोचनीय गोष्ट आहे. तथापि, निर्वासितांची देवघेव व्हावयाचीच तर ती आंतरराष्ट्रीय नियंत्रणाखालीं शांतपणें होणें अधिक इष्ट होय.

"जिनेव्हाला करण्यांत आलेला शांततेचा प्रयत्न अजून निष्फळ ठरलेला नाहीं. इंडोचीनमधील शांतता टिकून राहिल्यास आंतरराष्ट्रीय वाटाघाटींना नवी प्रेरणा मिळेल. १९५४सालीं इंडोचीन सगळ्या जगाला युद्धाकडे नेणार कीं काय अशी भीति वाटत होती. जागतिक मुत्सद्देगिरीनें त्या अत्यंत धोक्याच्या परिस्थितीवरहि मात केली आणि धोका पूर्णपणें नाहींसा केला नसला तरी कितीतरी कमी केला आहे. या दृष्टीनें इंडोचीनचें उदाहरण जगाला नवा धडा शिकवणारेंच ठरेल."

—गोवर्धन पारीख

---

## पुस्तक-परामर्श

**अलंकारप्रदीप** – लेखक **ग. त्र्यं. देशपांडे** एम्. ए. एल्एल्. बी. व **पु. गो. निजसुरे** एम्. ए. बी. टी. टी. डी. प्रकाशक : ठाकूर आणि कंपनी, लि. जि. अमरावती. (१९५४). पानें ३२४. किं. ३॥ रु.

लेखकांनीं प्रथमच सांगितलें आहे कीं, अलंकारमीमांसेचा हा प्रबंध नव्हे. विद्यार्थ्यांना उपयोगी पाठ्यपुस्तक या दृष्टीनें प्रस्तुत ग्रंथाकडे पाहावें. यांत अलंकारांचें विवेचन शिक्षणशास्त्राच्या तत्त्वांस अनुसरून निगमनपद्धतीनें केलें आहे. प्रथम उदाहरणें, त्यांचीं उकल व नंतर अलंकाराचें सामान्य लक्षण–याप्रमाणें अलंकारांचें विवेचन करीत असतां त्या त्या अलंकाराचा इतर अलंकारांशीं असणारा संबंध, त्यांचें साम्यभेद स्पष्ट केले आहेत. अलंकारांचें योग्य वर्गीकरण करून प्रत्येक वर्गातील अलंकारांचें स्पष्टीकरण केलें असल्यामुळें तें विद्यार्थ्यांस सुगम वाटेल. एकाच तत्त्वावर आधारलेल्या अलंकारांचें ग्रहण अधिक सुलभतेनें होतें. सादृश्यप्रतीतिमूल, विरोधमूल, न्यायाश्रयमूल, शृंखलामूल, गूढार्थमूल, इत्यादि वर्गीकरणांचीं तत्त्वें सर्वसंमत अशींच आहेत.

या पुस्तकाच्या प्रास्ताविक विभागामध्यें, 'वाक्यं रसात्मकं काव्यम्' हें विश्वनाथप्रणीत काव्यलक्षण सांगून त्यांत शब्दार्थ, गुण, अलंकार यांचें स्थान दाखविलें आहे. अभिधा, लक्षणा, व्यंजना या शब्दशक्तींविषयीं माहिती देऊन, व्यंजना आणि व्यंग्यार्थ यांचें काव्यदृष्ट्या महत्त्व स्पष्ट केलें आहे. गुण किंवा अलंकार यांचें स्थान स्वतंत्र नसून तें रसोचित आणि रसोपकारक असावें. शब्द, अर्थ, तन्निष्ठ गुण आणि अलंकार, रीति, वक्रोक्ति, ध्वनि, रस इत्यादि प्रकारें काव्यघटकांचें विश्लेषण आपण आपल्या सोयीकरतां करतों. काव्यनिर्मिति करणारा कवि किंवा काव्यास्वाद घेणारा रसिक यांचा अनुभव अविभाज्य एकघन असतो. तेव्हां शब्दार्थचमत्कृतिरूप अलंकारांचें वैचित्र्य अलगपणें

पाहून त्याचें कौतुक करतां येत नाहीं. व्यंग्यार्थ हाच शब्दसाहित्याचा परमार्थ होय, हें आनंदवर्धनाचें मतहि लेखकांनीं स्पष्ट सांगितलें आहे.

( विविध काव्यांगांविषयीं ही तारतम्याची दृष्टि विद्यार्थ्यांच्या मनावर जितकी जाणतेपणानें ठसेल तितकी इष्ट आहे. मध्यम – शालान्तपरीक्षेकरतां काव्याचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांचे ठिकाणीं या दृष्टीचा विकास करूं पाहणें, त्यांच्या अनुभवाच्या मानानें जरा दुष्करच होय. परंतु विश्वविद्यालयाच्या पहिल्या दोन वर्षांत व पुढेंहि ही औचित्याची दृष्टि उत्पन्न झाली पाहिजे. काव्याचें परिशीलन करीत असतां यमकानुप्रास आणि उपमोत्प्रेक्षादि अलंकारांनीं म्हणजे शब्दार्थचमत्कृतीमुळें चित्त आकर्षिलें जातें; आणि सूक्ष्मतर रसतत्त्व किंवा अंतःसौंदर्य यांची प्रतीति त्यांना किती होते याची शंका वाटते.

विश्वविद्यालयामध्यें 'काव्यप्रकाशा'चें जें अध्ययन होतें त्यांत दहाव्या उल्लासांतील अलंकारांवरच भर दिला जातो. ध्वनिभेद आणि रसस्वरूप यांविषयींचा चौथा उल्लास बाजूलाच राहतो. केवळ बुद्धिगम्य अशा सूक्ष्म भेदबाहुल्यामुळें अलंकारांची संख्या ११० पेक्षां अधिक वाढलेली असून त्यांतील अनेक अलंकार अपवादानेंच आढळतात. आणि व्यंग्यार्थापेक्षां वाच्यार्थानें वैचित्र्य दिसून येतें. आपले साहित्याचार्य अशा काव्याची उत्तम काव्यांत गणना करीत नाहींत. अलंकाराच्या अभ्यासाविषयीं अशी वस्तुस्थिति असल्यामुळें विद्यार्थ्यांकरतां कां होईना, अलंकारांचें निरूपण करावयाचें असतां, काव्याचें रसरूप जें खरें सौंदर्यमूल्य आहे त्याचें व इतरहि काव्यांगांचें यथोचित दर्शन कसें आवश्यक आहे हें कळून येईल. अलंकारांचा अभ्यास बुद्धिचापल्याकरतां पाहिजे तर करावा. परंतु काव्यसौंदर्याच्या दृष्टीनें त्यांत समतोलपणा राखला पाहिजे.

अशा प्रकारचें रसिकमान्य उद्दिष्ट साध्य होण्याकरतां संस्कृतसाहित्यशास्त्राच्या आधारें मिळणारें काव्यस्वरूपाचें सामान्य ज्ञान अलंकाराच्या अभ्यासकाला उपकारक होईल यांत शंका नाहीं. परंतु त्याबरोबरच इंग्रजी टीकाशास्त्रामध्यें वाङ्मयाच्या स्वरूपाविषयीं जें मूलग्राही विवेचन आढळतें त्याचाहि स्थूल परिचय आपल्या विद्यार्थ्यांस व्हावा. इंग्रजी टीकाशास्त्राची रूपरेषा ( Outline of the Science of Criticism ) त्याला अवगत व्हावी. काव्यामध्यें किंवा कोणत्याहि उच्च वाङ्मयकृतीमध्यें जी एक जीवनविषयक अभिनव प्रतीति ( new consciousnees ) आणि अनुभूति लाभते, नवसौंदर्याचें दर्शन होतें, त्याचेंच इतर काव्यांच्या अपेक्षेनें सर्वाधिक महत्त्व आहे या गोष्टीवर त्यांचें लक्ष्य केंद्रित झालें पाहिजे. त्यांस काव्याच्या महान् आशयाचें आकलन व्हावें, केवळ वाच्यार्थनिष्ठ अलंकारप्रपंचाचें नव्हे.

अर्वाचीन मराठी लेखकांनीं लिहिलेल्या 'अलंकार चंद्रिका', 'काव्याचीं भूषणें', 'काव्यविभ्रम' इत्यादि पुस्तकांमध्यें 'अलंकार-प्रदीप,' या पुस्तकानें त्यांतील अलंकारविषयक संपूर्ण आणि सुबोध विवेचनामुळें चांगली भर पडली आहे.

– य. र. आगाशे

---

## प्राची - लेखक : प्रा. गो. म. कुलकर्णी

प्रकाशक : दा. ना. मोघे, कोल्हापूर ( १९५४ ).

प्रा. कुलकर्णी यांच्या 'रसग्रहण' या सुंदर पुस्तकावरून त्यांच्या काव्याविषयीं वाचकांनीं जर कांहीं कल्पना केलेल्या असल्या तर त्या या 'प्राची'च्या तेजानें अधिकच उजळून गेल्याविना राहणार नाहींत. शिवाय 'रसग्रहणापूर्वी' या आपल्या प्रस्तावनेंत मराठी काव्याचे विद्वान् टीकाकार प्रा. रा. श्री. जोग यांनीं म्हटल्याप्रमाणें "कवि म्हणून ते लोकांस फारसे परिचित नसले तरी ते चांगलें काव्य लिहितात, हें मला माहिती आहे. काव्यास्वाद कसा घ्यावा हें सांगावयास निघालेल्या माणसास काव्य कसें लिहितात याची अनुभवानें कल्पना असावयास पाहिजे, हें कांहीं आवर्जून सांगावयास नको."

कवीनें आपल्या चटकदार कवनांच्या या संग्रहाला 'प्राची' हें नांव दिलें आहे. 'प्राची' या प्रथम कवितेंत "कधीं निखिल संताप हुरहुर हृदयींची आणि ओतील जगांत दिव्य प्रकाश ही प्राची" अशी आपली तळमळ कवीनें व्यक्त केली आहे. या संग्रहांतील बहुतेक सर्वच कवितांचा तोंडावळा, विचारांचें चलनवलन, पेहरावांतील थाटमाट अगदीं आधुनिक असला तरी 'प्राचीन'च आहे, हें कोणतीहि एखादी कविता वाचून कळण्यासारखें आहे. विषयांची निवड आणि ते सजवण्यासाठीं शोधलेले दृष्टांत हें नुसतेंच पूर्वेकडील







नाहींत तर तिचे संस्कारहि सांस्कृतिक दृष्ट्या प्राचीनच आहेत. स्पष्टच बोलायचें तर प्रा. कुलकर्णी यांची कविता पौराणिक पुरावे आणि सांस्कृतिक संदर्भ सांगत सांगतच रंगारूपाला येते. जुन्यांतून नवी निष्पत्ति करून दाखवण्याचें कसब ' प्राची 'मध्येंच प्रकर्षानें प्रकट झाल्याचें प्रत्ययाला येतें.

प्रस्तुत काव्यसंग्रहांतील आद्यंतींच्या ओळीसुद्धां याचीच साक्ष देतील. ' प्राची'च्या पहिल्या कवितेच्या पहिल्या ओळी अशा आहेत : " रात्र संपतां संपेना, एकली मी उदासीन । प्राण कंठीं झाले गोळा, वाट पाहून पाहून ". यातील वृत्तीच्या अनुरूपच 'ताटी खोला ज्ञानेश्वरा' या शेवटच्या कवितेंत अखेरच्या ओळींतून पुढीलप्रमाणें आर्तवाणी आलेली आहे. " कथा ऐका हो आमुची ऐका निर्वाणीच्या हांका । आणि अंधारीं या दावा नवी भावार्थदीपिका ॥ " या आद्यंतींच्या पंक्तींवरूनहि आपल्याला असें दिसून येतें कीं कवीला ' नवी भावार्थदीपिका ' हवी आहे. त्याच्या काव्यांत ती नाहीं आणि स्वतः निर्माण करण्याचा अभिनिवेश असूनहि तो नम्रपणेंच जुन्या परंपरेला अनुसरून आपल्याला आदरणीय अशा अवतारी पुरुषाचा धांवा करतो. तसेंच हेंहि कळतें त्याला तक्त नको असून तो भक्त व्हायला तयार आहे. जुन्या रस्त्यावरून नवप्रकाशाच्या झगझगाटांत नवी मोटार मिरवण्याची त्याची तयारी आहे. ही ध्वनित होणारी कवीची मनःप्रवृत्ति आपल्याला या संग्रहांतील अनेक गीतांवरून पडताळून पाहण्यासारखी आहे.

' प्राची ' मधील अनुक्रमणिकेंत दिलेलीं नुसतीं कवितेचीं शीर्षकें पाहिली तरी त्यावरूनहि कवितेचे विषय विविध असून ते आधुनिक आहेत असें दिसून येईल. त्यांत ' उकिरड्या ' पासून ' उल्केच्या पाषाणा'-पर्यंतचें विस्तृत क्षेत्र आहे; ' मुडदेफरासा ' पासून ' भोळ्या सांबा'पर्यंत सर्वांना स्थान आहे. यांत ' ॐ सहस्रशीर्षः ' पासून तों ' शांततेच्या मेजावर ' चर्चा चाललेली दिसते. परन्तु कोठेंहि कवीनें ' प्राची'नता सोडलेली नाहीं. आत्मनिष्ठा तर त्यांत आहेच पण काव्य-विषयाशीं प्रामाणिक राहूनहि ती आत्मनिष्ठा दर्पो-क्तीनें डागळलेली नाहीं. उलट, " जीवनार्थ धडपडणें, धुवढाच मम विक्रम । साधारण प्राणी मी साधारण माझा क्रम " या सामान्यत्वाच्या जाणीवेइतकी ' साध्य तुझें साधाया होणार न मी साधन । शिकवूं नको मज स्वधर्म, ज्ञात असें विहित कर्म ' असें खडखडीतपणें बजावण्याइतपत निर्भयताहि कवीच्या ठिकाणीं आहे. त्यामुळेंच केशवसुतकालीन कवीप्रमाणें निर्झर, फुलें, तारका अगर ' — स ' यांच्या आडोशानें कवीला भीतभीत बोलण्याचें कारणच नाहीं. याच कारणासाठीं कवीची उत्साही वृत्ति त्याच्या उदासीनतेइतकीच आकर्षक झाली आहे. मात्र हें खरें कीं कवीचा मनःपिंड आशावादी आहे कीं निराशावादी आहे हें निःसंदिग्ध ठरवणें प्रसंगीं अवघड झालें आहे. ते भाविक असले तरी अंध-श्रद्धाळू नाहींत. त्यांना नावीन्य अभिप्रेत असले तरी तें क्रांतीनें येणारें नसून विकासवादाला अनु-सरून येणारें असावें. त्यांचा समाजवाद हा सुद्धां सुधारणावादच वाटतो.

या प्राध्यापक कवींनीं आपली ' प्राची ' अंधारांत चांचपडणाऱ्यास समर्पण केली आहे. पाश्चात्त्य राष्ट्रां-तील विद्या-कला व अर्वाचीन शास्त्रीय संशोधनानें उपलब्ध होणाऱ्या सुखसोयी यांकडे दृष्टि देऊन तुलनेनें पौरस्त्य प्रदेश मागासलेले, अंधारांत चांचपड-णारे, अगम्य आत्मानात्मविचारांतच रंगणारे आहेत. त्यांनीं वास्तववादी दृष्टि ठेवून या प्राची-भर दिसणाऱ्या नवप्रकाशाकडे पाहावें आणि इहपर साधावें असेंच कवीला सुचवावयाचें आहे, असें वाटतें.

' प्राची ' हा एक नव कवितांचा संग्रह आहे हें वर आलेंच आहे. आणि नवकवितेचें एक वैशिष्ट्य ( कीं न्यून ? ) वैफल्यदर्शन तें यामध्येंहि आहे. नवकवितेंतील वैफल्य हा एक जागतिक वैफल्याचाच एक परिणाम आहे, असें कधीं कधीं सांगितलें जातें. प्रस्तुत संग्रहांत दिसणारी उदासीनता या जागतिक विफलतेपासून सर्वस्वीं अलिप्त नसली तरी त्यांतील मुख्य भाग वैय-क्तिक अपेक्षाभंगाचाच आहे. ' शांततेच्या मेजावर ', 'ॐ सहस्र शीर्षः' 'भोळ्या सांबा ,' 'मुडदे फरास' वगैरे सारख्या कांहीं कवनांतून जागतिक विचारप्रवाहांचे सूर ऐकूं येतील; परंतु मुख्य भर व्यक्तिवादी आत्मनिष्ठ विचा-रांचा आहे, हें ' कोष', ' मरणाच्या भीतीनें', ' काळिज हें ठिकक्तसें ' अशांसारख्या अनेक कवितांवरून














नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

Regd. No B 5177

# Enemy Sighted . . .

Here in a modern laboratory, a pathologist probes into the secret life of the enemy — a disease germ. There in a dark room, a nuclear scientist traces the rapid passage of a radio-active particle. A few streets away in a dimly lit chawl, a social worker tries to unravel the distressing problems of a day labourer.

The scientist in India today is doing a vital job to promote the physical and social health of the Nation. He opens the door to a wider knowledge of the world we live in. Though many victories have been won in the scientific field, there is yet much to learn and much to achieve.

The Indian Institute of Science at Bangalore stands out as a monument to the founder of the House of Tata, symbolising his ideal of philanthropy. The National Metallurgical Laboratories at Jamshedpur, the Cancer Hospital, the Institute of Social Sciences and the Institute of Fundamental Research in Bombay, and the National Chemical Laboratory at Poona, demonstrate that the tradition established by the Founder still prevails.

Research as the handmaid of industry is the concept which pervades all Tata enterprises.



*Tata cor ibutions to our national life include:*

Steel . Textiles . Hydro-Electric Power . Chemicals . Locomotives & Engineering
Soaps, Glycerine and Edible Oils . Hotels . Machine Tools . Radios . Insurance
Cement . Industrial Investment . Social Sciences . Scientific Research.

**TATA INDUSTRIES LIMITED**

TSL. 5748

अनुक्रमणिका